# " घर ! "

( विकृतीचें वरदान लाभलेल्या आजच्या पांढरपेशा पिढींतील
एका कल्पक तरुणाची भावकथा — )

लेखक

वसन्त कानेटकर

मे १९५१ ]

[ किंमत तीन रुपये

# FOREWORD

My young friend, Vasant Kanetkar surprised me the other day by teling me that he had written a novel and that I should write a Foreword to it. I had known him as a young lad in Willingdon College studying under me. When I met him at Nasik after a few years, he had developed into a Professor of Marathi like his father. And I now find that he is a poet, for his novel is a Lyric narrative.

Vasantrao has experimented here with a new technique and I think he has succeeded more than many novelists do in their first novels. The gulf between aspirations and actuality, the clash between the individual and his invironment : that is the theme of " GHAR " Frustration is one of the Serious maladies of this revolutionray age Vasantrao has diagnosed it and described it effectively in one of its manifold aspects. He had, in doing so, to resort to the " Symbolic " and the " Stream of Consciousness " method in fiction The psychoanalytical method permits a free blending of fantasy with actuality. Fantasy brings lyric meditation in its wake, and Vasantrao has employed free verse to convey these meditations. Vimal and her black-marketeering husband; Gouri and her farmar husband, these are happy in their own way in Bombay. It is only the sensitive and moneyless bourgeouis, that is plunged in suffering, for he has a conscience, a spiritual luxury or torture which debars him from the seeming happiness of others The story of this suffering is introduced from the point of view of Indumati, the young grass-widow in the Konkan with three children on her hands It is developed from the point of view of Raghunath, the young husband

employed in Bombay on the editorial staff of a newspaper called fittingly enough "Manavata" or Humanity. All the pathos and the poetry of the lack of accommodation in Bombay has been brought out vividly in the novel. The sparrows can live where they like in Bombay, even on the choiest flats and hold together their little families. But whàt is possible for sparrows is beyond even the rosiest dreams of hundreds of young men like Raghunath.

Vasantrao has shown admirable skill in presenting the conflict in Raghunath's mind. The hurdles which Raghunath has to cross while endeavouring to catch the train, he misses in the end; the evil which passes in quick succession before him in the form of Mari, Gouri, Anuradha, and the prostitute, beckoning him to ruin, when he, sex-starved, is prevented even from spending three days of hard-won leave in the year with his wife; and the conscience which finally recoils in the horror from these temptations : all these are described imaginatively and with keen understanding. The plane dream in the newspaper office and the bus incident serve to bring out, in terms of fantasy, the full pathos of the situation. The narration of Batliwala's achievements in Burma sounds rather " Sexy ". But " Sex " is presented and interpreted in the novel in terms of unmistakable health. Passing through this welter of contrasts and frustrations, one discovers a deeper loveliness in the saying:--

"Home,sweet home,There is no place like Home"

To ask how all these sensational things could have befallen Raghunath in the course of a day, is to judge solely by realistic standards the novel

which in effect, blends the fantastic and the actual. To complain that the story halts or that there is hardly a story in the novel is to protest against the psychoanalytic method rather than the novel itself. The story is etched out so that one can easily fill the outline. The psychoanalytical narrative that emerges within the framework of the method is vivid and superb.

Vasantrao has, by implication laid bare in this novel the philosophy of the Home. He has shown the humanistic basis of domestic life, the urge of civilisation which fulfilled itself by evolving the institution of marriage. Another thing Vasantrao could have done. But he is too young for it and I am afraid we are not justified in expecting it from him when he is just preening his wings. He has brought out the pathos and the tragedy of the situation. But there is the Time-spirit seated beyond Tragedy and Comedy, breaking and saving countless lives. Lack of accommodation is the post-war manifestation of the Time-spirit in Bombay. But it may manifest itself yet in many unexpected ways. While man feels helpless in the presence of these manifestations, there is strength in accepting them calmly, facing them squarely and asserting oneself against them ceaselessly. All nacked truths, as Keats says, must be borne and circumstance must be envisaged calmly. That is the ' Top of sovereignty '.

One can legitimately expect from the teeming brain and the active pen of Vasantrao, things lovelier even than " GHAR. " I shall look forward to them.

Rajaram College, Kolhapur,
14 January, 1951. **V. K. Gokak.**

# निवेदन

ग्रंथरूपाने प्रकाशित होत असलेली ही माझी पहिलीच कादंबरी आणि माझे पहिलेंच पुस्तक. माझ्या साहित्य—संसाराला आरंभ बऱ्याच वर्षांपूर्वी झालेला असला तरी कांहीं वैशिष्ट्यपूर्ण कृतीखेरीज रसिकांच्या-पुढें यावयाचें नाहीं, या माझ्या हट्टामुळें आतांपर्यंत मी प्रकाशनाच्या जगापासून अलिप्त राहिलों होतों. ही कादंबरी रसिकांच्यापुढें करतांनाहि माझा हट्ट किती यशस्वी झाला आहे याविषयीं मी स्वतः साशंक आहें. परंतु मराठी रसिकांच्या सहृदयतेवर आणि सौजन्यावर डोळे लावून, मी या क्षेत्रांत पाऊल टाकीत आहें.

या कादंबरींतील विषय वाचकाना नवीन वाटूं नये इतका, दुर्दैवाने गेल्या महायुद्धानंतर तो पांढरपेशाच्या घरोघरीं सुरुंग लावीत शिर-लेला आहे. परतु गेली कित्येक वर्षे या कथावस्तूवर चिंतन चाललें असताना माझ्या मनांत जो आशय भरून राहिला होता त्याचे या कादंबरींतील रौद्र भीषण स्वरूप वाचकाना कदाचित वेगळें वाटण्याचा संभव आहे. या आशयाचे अर्थ उमजत गेल्याबरोबर मी वेळोवेळीं अत्यंत अस्वस्थ होत गेलों होतों. या अनुभूतीचें प्रत्यक्ष चित्रण करतांनाहि अभिव्यक्तीच्या उपलब्ध साधनांशीं मला झुंज घ्यावी लागलेली आहे. यंत्रयुगांतील निर्वासितांची ही नवीन जात जेव्हा ठसठसीतपणें माझ्या मनावर बिंबली होती, त्यावेळीं या विषयावर कधीतरी एकादी लघुकथा लिहितां येईल, या आशेनें मी विषय तो मनाच्या कोपऱ्यात टाकून दिला होता. परंतु फार काळ हा विषय कोपऱ्यांत राहूं शकला नाहीं. ज्या ज्या वेळीं कथावस्तूचें दर्शन मला जवळून घेण्याचे प्रसंग लाभले, त्या त्या वेळीं त्यांतील खोल

आशयाचें तीव्र व्यापक स्वरूपहि मला प्रकाशित होत गेलें. त्यामुळेंच मूळची योजना बदलून या विषयावर निवेदनात्मक पद्धतीनें एक लघु कादंबरी लिहिण्याचा मला संकल्प सोडावा लागला. परंतु प्रत्यक्ष चित्रणासाठीं वसेतोंपर्यंत मला काय करावें लागणार आहे, याची कल्पना मला येऊं शकली नाहीं. चित्रणाचे वेळीं मी मनांतला आशय गोळा करूं लागलों तेव्हां उपलब्ध निवेदनाचें तंत्रहि किती पागळें आहे त्याचा मला प्रत्यय आला. त्यांतूनच निवेदनासाठीं मला वेगळेच मार्ग चोखाळले पाहिजेत याची स्पष्ट जाणीव झाली. कथानिर्मितीचा हा सबंध इतिहास सांगण्याचें कारण असें का प्रस्तुत कादंबरींतील आशयाप्रमाणेच निवेदनाच्या पद्धतींत वाचकांना वेगळेपणा आलेला दिसून येईल. साध्या कथा--कथन पद्धतीमध्यें संस्कारवादी आणि प्रतीकवादी निवेदनपद्धति मिसळलेली त्याना दिसेल आणि संज्ञाप्रवाहामध्येंच मुक्तछंदांची योजना केलेली आढळेल. हें मिश्रण कितपत साधले आहे त्याचा निर्णय वाचकांनीं द्यावयाचा आहे. परंतु ही धडपड केवळ नाविन्यासाठीं वा निवळ प्रयोगासाठीं मी केलेली नाहीं, असें रसिकाना मला आवर्जून सांगायाचें आहे. अनेक महात्म्यानीं जोपासलेली मानवी समृद्धीचीं सुन्दर स्वप्ने बेचिराख करणाऱ्या या कठोर " शास्त्र आणि शस्त्र " युगानेंच बोट धरून मला या मार्गावर आणलें आहे. अनुभूती व्यक्त करण्याच्या या धडपडींतूनच या वेगळेपणाचा जन्म झालेला आहे. एक वर्षाच्या धडपडीनंतर ही कथा मी आज हातावेगळी करीत आहे. रसिकाच्यापुढे प्रत्यक्ष कृति ठेवतांना यापेक्षां अधिक काहीं सांगणें अनुचित आणि अतिक्रमाचे होईल. माझ्या प्रयत्नाचें यशापयश अजमावण्यास महाराष्ट्राची चिकीत्सकता सूक्ष्म आणि रसिकता थोर आहे याचा मला विश्वास आहे.

ही कथा प्रकाशित होण्यापूर्वीं ज्या रसिक चोखंदळ मित्रांनीं तिचे प्रत्येक पैलू कानसून अधिक उज्ज्वल केले, त्याचे कृतज्ञतापूर्वक आभार

मानणें माझें कर्तव्य आहे. सांगलीच्या विलिंग्डन महाविद्यालयांतील अर्थशास्त्राचे प्राध्यापक नानासाहेब मावळणकर, माझे वडील कवि गिरीश, माझे मित्र श्री. पु. ल. देशपांडे आणि त्यांच्या पत्नि सौ. सुनीताबाई आणि माझे विद्यार्थी मित्र श्री. यशवंत हडप या सर्वांच्या रसिक आणि मार्मिक चोखंदळ पण सहृदय उत्तेजनाशिवाय ही कथा प्रकाशित करण्याचा धीर मला झाला नसता यांत तिळमात्रहि अतिशयोक्ति नाहीं. प्रस्तुत कृतीचे उत्साही प्रकाशक आणि माझे स्नेही श्री. पंडितराव कुलकर्णी यांनीं स्वीकारलेली प्रकाशनाची जबाबदारी मला तितकीच मोलाची वाटते. या सर्वांचे मी मनःपूर्वक आभार मानतों.

जिचे आभार मला मानतां येत नाहींत ( आणि आभार मानण्यास मला परवानगी नाहीं ) अशी एकच व्यक्ति आहे. या कथेच्या लेखनारंभापासून तों अखेरची मुद्रणप्रत तयार होईपर्यंत या व्यक्तीच्या प्रखर चिकित्सेची आणि अमर्याद उत्साहाची प्रस्तुत कृतीवर दाट छाया पडली आहे. मैत्रीचे संबंध व्यावहारिक सौद्यापुरतेच नसतात, तर आन्तर्मनाच्या सहप्रवासांत ते निगडीत झालेले असतात सहप्रवासांतील या सोबत्याचे म्हणूनच, केवळ या कृतीसाठीं मला आभार मानणें शक्य नाहीं. अनेक जीवनऋणाप्रमाणें हेंहि जीवनऋण मी जागृत पण अव्यक्त ठेवीत आहें.

ह. प्रा. ठा. कॉलेज, नाशिक

—वसन्त कानेटकर.

# उपोद्घात

लंकेच्या कोठें दूर डोईवर
वायव्य दिशेला, सागर तीराला,
जगापासूनी एका कोपऱ्याला,
एका बेटांमध्यें नांदतें पहा कावळ्यांचें राज्य.
कावळें राज्य, कावळी संस्कृति.
अतिप्राचीन ! वैभवशाली !
जियेचा धागा सांपडतो मागें उपनिषदांत,
वेदांच्या ऋचेंत, पोथ्या पुराणांत,
आणि कांहीं जुन्या शिलालेखांत.
अशा या बेटांत,
पहा मिरविती घोषफलक डामडौलांत काळे कावळे.
" सर्वेऽपि सुखिनः सन्तु
सर्वे सन्तु निरामयाः
सर्वे भद्राणि पश्यन्तु
मा कश्चित् दुःखमाप्नुयात् "
रस्त्यारस्त्यांत, चौकाचौकांत
पाहोनी, ऐकोनी येतात येथें
देशोदेशींचे शेकडों हजारों भुकेले कावळे,
भराया आपुलें टिचके पोट
अन्न उच्छीष्टानें.
पहिली तांबूस पिवळी धूळ
दिसतां जरा क्षितीजावरी उदसतांना,
झाडाझाडांतून, फांदीफांदींतून
कावळे करीती ' काव काव काव ...'
भरारा उडती अंतराळांत.
उद्योगी मुंग्या वारुळांतूनी जशा पडती नित्य बाहेर;

घ. ...२

राबून राबून दिवस रात्र
कणाकणानें बेगमी करीती
अन्नधान्याची-भविष्यासाठीं—!
दूरदर्शी अन् शहाणी मोठी अशी मुंगीबाई—
नव्हे पण ही शिधायुगांतली!
सत्य युगांतलीं संपलीं स्वप्नें!
कली युगाचे कावळेहि आतां
राबून राबून दिवस रात्र
चिपाड होती, भांडभांडूनी
हाडूकासाठीं कोण्या एकल्या श्वानराजानें फेकीलें
जया नीरस म्हणून—
किंवा चाळींमध्यें मोरीमोरींतून टपकलेल्या उच्छीष्टांसाठीं-
काक नजरेंत कलहाची धुंदी.
भोगाची मस्ती, श्रमाची सुस्ती.
कावळा फिरवी गरारा आपुला एकुलता डोळा
राखाया आपुली लाखाची जिंदगी,
जी पैदा केली मृत संस्कृतीच्या पिंडास शिवून
कावळा म्हणेना-"हा बाप, ही आई."
कावळा मानेना-हा भाऊ, ही ताई.
बाईल पोरें स्नेही सोबती
कावळा म्हणेना कोणीहि आपुले.
आपुलें एकच! पोटोबा विठोबा!
'विठोबाची' पूजा कराया
ठायीं ठायीं हीं व्यापारपेठेचीं, कोर्ट कचेऱ्यांचीं,
ऑफिस बँकांचीं, गिरणगांवांचीं,
पहा उभारलीं भव्य मंदीरें.
सारेच कावळे पोटाचे लाचार.
परन्तु थोडे त्यांतील कांहीं
करुनी सांठा दिव्य उच्छीष्टांचा

उभारुनी कोट भोंवतीं त्यांच्या
शास्त्रवचनांचा, कायदेकानूंचा, सत्यअहिंसेचा,
हजारों पोटें राबविती रोज
आपूल्या सदाच्या रित्या पोटासाठीं
पोटासाठीं हीन; बीनबुडाच्या कीं पोत्यासाठीं ?
यदाकदाचित,
अशा कोटावर घेतली धडक मानवस्पर्शित कोणी
कावळ्यांनीं ?
बिशाद काय ?
सुरक्षिततेचा काळा कायदा घेऊन बडगा उभा हा इथें !
बंडखोरांना सजाहि तशीच कावळ्यांच्या या पाक राज्यांत
लचके लचके तोडून तोडून
चेचून ठेचून मारतील हे नीतीचे रक्षक कावळे काळे.
असूया, भीती, कलह, भोग
लागती कसरी मनाच्या भींतींना
वरून दिमाख, आंतून मात्र पोखरलेले पोकळ वासे
अहंकारानें भाजले, डागले,
न्यूनगंडानें पछाडलेले,
उच्छिष्टासाठीं लालचावलेले…
अशी ही नांदते थोर संस्कृति…
असे हे वंशज आर्यपुत्रांचे
फांदीं फांदींतून करीती गर्जना आणि घोषणा…
" सर्वेऽपि सुखिनः सन्तु
सर्वे सन्तु निरामयाः
सर्वे भद्राणि पश्यन्तु
मा कश्चित दुःखमाप्नुयात्…"

* * *

" एवढं एवढंसं पाखरूं
लालं लालं त्याची चोंच
गुंजावाणी ग त्याचे डोळे
शेताभातांनीं बाळ खेळें कीं पाखरूं माझं...

—परसांत आडाशेजारीं धुण्याच्या दगडावर पाय देऊन इंदुमती उभी होती. कडेवर छोटी निमा किरकिरत होती. तिला ताटलींतला भात भरवीत इंदुमती तोंडानं गाणं म्हणत होती. तिनीसांजा टळून गेल्या होत्या. आणि पौर्णिमेचा चंद्र सरडेश्वराच्या टेकडीखालून कितीतरी वर आला होता. आकाशलिंबाच्या सळसळणाऱ्या पालवीमधून इंदुमतीनं नजर टाकली. निळ्याभोर आकाशांत उगीचच रेंगळणारे एकदोन ढग तोंडावर ओढून चंद्र हंसत आहे असं तिला वाटलं. आणि हंसता हंसतां मधेंच ढगांतून तोंड काढून मिस्कीलपणें डोळे मिचकावून म्हणतो आहे—" एक माणूस वाट पाहून पाहून काय पण अगदीं थकून गेलंय—!" आणि तिचे डोळे आपोआप सरडेश्वराच्या टेकडीला वळसा घालून गेलेल्या घाटमाथ्यावरील वाटेकडे गेले. कान न कळत धमणीच्या बैलजोडीच्या घुंगरांचा कानोसा घेऊं लागले. डोळे थकले आणि कान शिणले तेव्हां उगीचच चिडून ती मनाशीं म्हणाली—" यायचे असले तर आल्याशिवाय कांहीं राहात नाहींत ते! अजून कांहीं वेळ टळून नाहीं गेली त्यांच्या येण्याची." पण मग मागाहून तिचेंच मन तिला भलभलत्या शंका विचारून हैराण करूं लागलें.

"...खरंच येतील ना? कीं मागच्याप्रमाणं कांहींतरी काम निघून अगदीं निघायच्या वेळीं बेत रहित व्हायचा? छे, पण असं नाहीं व्हायचं! सहा महिन्यांपासून कॅलेंडर समोर ठेवून ही तीन दिवसांची रजा ठरवून ठेवली होती त्यांनीं. प्रत्येक पत्रांतून अगदीं दिवस मोजण्याचं स्वारीनं काम

चालवलं होतं. घरीं यायची, आपल्याला, मुलांना आणि सासूबाई-मामंजींना भेटायची, त्यांना कमी का उत्सुकता आहे? मायेचं माणूस आहे कोण मेल्या त्या मुंबईत? सगळे पैशार्थी आणि पोटार्थी! एक विमलाबन्स आहेत, पण त्या आपल्याच श्रीमंतीच्या तोऱ्यांत. पण मग घरीं यायची टाळाटाळ कां चालते अशी स्वारीची?

नेहमींचंच आहे हें! गडबडीनं यायचं आणि गडबडीनं जायचं. आणि आले म्हणजे तरी काय-राहातील, बसतील, आपल्याशीं बोलतील? नांव नको! आतां धमणींतून उतरले कीं मुलं गिल्ला करतील, आंगाशीं बिलगतील, त्यांना खाऊं नि खेळणीं देऊन वाटेला लावतां लावतां जायचीं नाहींत. तोंपर्यंत मामंजी आहेतच शेताचा वसूल नि घराची दुरुस्ती यांची कटकट करायला तयार. अगदीं जीव शिणेपर्यंत ऐकवतील सारा इतिहास. बाबत ती काय मेली आणि तेवढ्यासाठीं माणसाचा छळवाद तो किती करायचा? मामंजींची कूरबूर संपतेय तों सासूबाई पुढें होतील, आणि व्रत, वैकल्यं आणि यात्रा याविषयीं टुमणं धरतील. त्यांना तर वाटतं कीं आपला लेक म्हणजे मुंबईचा "गवरनेर" आहे. दिवस हे असे नि यांना आपले यात्रेचे विचार सुचताहेत. "सुनबाईला चार दिवस मुंबईला घेऊन जा"—म्हणून कांहीं म्हणणं व्हायचं नाहीं तोंडांतून. पण मुंबईला जायचं कुठं? यांच्यासारखं खानावळींत? नको ग बाई! यांच्याच मागचा खानावळीचा वनवास कधीं संपायचा आहे कोण जाणे! रहायला केव्हां जागा मिळेल तें एक देवालाच ठाऊक. नुसती आश्वासनं मात्र देतात प्रत्येक पत्रांतून. थोडीथोडकीं नाहीं. आठ वर्षें झालीं—सासूबाईचं पुराण चाललेलं आणि आपल्याला मात्र आपल्या माणसाशीं बोलायची चोरी. रात्री माडीवर आंथरुणं घालून आणि मुलांना झोपवून आपण वाट पाहून

कंटाळलों तरी यांच्या गप्पा म्हणून संपायच्या नाहींत. कंटाळून आणि रागावून आपण गादीला पाठ टेकल्याबरोबर आपल्याला झोंप लागेल. आणि मग मध्यरात्रीं केव्हांतरी त्यांच्या हाताचा आपल्या शरीराला स्पर्श होतांच आपण खडबडून जागें होऊं. उल्हासानं प्रेमानं मिठी मारण्यासाठीं आणि जिवाभावाच्या साऱ्या गोष्टी सांगण्यासाठीं आपण त्यांना बिलगायला जाऊं. पण त्याच वेळीं ते आपले ओंठ ओठानं टिपतील, लंपटपणानं पदरांत हात घालतील नि दिवा मालवीत आपल्या आंगाशीं झोंबूं लागतील.

उन्मादाचा भर ओसरल्यानंतर आपण त्यांच्याशीं बोलायला जाऊं तर, थकून शिणून आपल्या बाहूपाशांत जे झोंपी जातील ते अगदीं पहाटे आपली उठायची वेळ होईपर्यंत. झोंपीं गेलेलं त्यांचं मस्तक छातीशीं घट्ट धरून पुन्हां पुन्हां आपण चुंबनांचा आणि अश्रूंचा पाऊस पाडूं, तेवढंच काय तें त्यांचं आपल्याला सहवास-सुख. सकाळ झाली कीं, माणसांची वर्दळ आणि पांचपन्नास ठिकाणचीं बोलावणीं! अगदीं परत निघायची वेळ झाली, म्हणजे मग परसांत याच आडाशेजारीं धुण्याच्या दगडासमोर उभं राहून हंसून म्हणायचं होईल- "आतां पुढल्या खेपेला आलों म्हणजे किनई तुझ्याशीं खूप खूप बोलेन." आपल्या डोळयांतलें पाणी पाहून कळवळून झटकन जवळ येतील तोंच मामंजी ओसरीवरून खांकरून म्हणतील-"हं. रघोबा, ऽऽ आटपा आता! गाडी केव्हांची उभी आहे. बैलजोडी खळखळ करायला लागली आहे." दोन मिनिटांनीं बैलांचा जसा कांहीं प्राणच चालला होता. आणि मग बघतां बघतां यांना घेऊन धमणी सरडेश्वराच्या टेकडीला वळसा घालून घाटमाथ्यावरील वाटेनं दिसेनाशी होईल.

धमणी दिसेनाशी झाली म्हणजे मग आपल्याला आठवेल कीं, कितीतरी गोष्टी स्वारीला विचारायच्या आणि बजावायच्या राहिल्या

आहेत. मुंबईला आतां जागा मिळायला किती दिवस लागतील ? खंडेराव मास्तरांच्या मुलाबरोबर पापड, लोणचं आणि लसणीचं तिखट पाठविलं होतं तें मिळालं कीं नाहीं ? आतां गेल्यावर न चुकतां पत्र टाकायचं. घरीं माणसं डोळ्यांत प्राण आणून वाट पाहात असतात याची आठवण ठेवायची–आणि...आणि ती महिन्याची रजा मिळणार होती त्याचं काय झालं ? एक ना अनेक ! कामधाम करतांना मागाहून आठवायला लागेल आपल्याला; आणि प्रत्येक आठवणीबरोबर आपला जीव हळहळेल.

आजचंच नव्हे हें. लग्नाला आठ वर्षें झालीं. होय, दिनूलाच येत्या अश्विनांत सहावं सरून सातवं लागेल. लग्न होऊन आपण सासरीं आलों आणि स्वारीची पहिल्या रात्रीं पहिली ओळख झाली. त्या वेळीं जे प्रश्न विचारायचे राहिले, तेच आठ वर्षांनंतर या घटकेपर्यंत विचारायचे राहिलेच आहेत. बदल झाला असला तर माणसामध्यें, –प्रश्नामध्यें नाहीं. पूर्वी आपण एकटीच वेड्यासारखी वाट पाहात असूं. वर्षाभरांत छोटा दिनू जन्माला आला आणि आपल्याला सोबत करूं लागला. नंतर दोन वर्षांनीं नंदाचा जन्म झाला आणि आणखी एका माणसाची वाट पाहण्यांत भर पडली. दीड वर्षापूर्वी निमा आली. आपल्या शिकण्याचा प्रश्न उगवला तसाच मावळला आणि आतां प्रश्न पडला आहे तो हा कीं, दिनूच्या शिकायची काय व्यवस्था करायची ? त्याला शहरांतल्या शाळेंत पाठवायचा कीं, इथंच जांभळीला रामोशांच्या शाळेंत घालायचा ?

रामोशांच्या शाळेंत नको ग बाई ! रामोशांच्या शाळेंत म्हणजे राजरोस म्हारापोरांच्या घाणेरड्या संगतींत. नुसता घरीं राहिला आहे तर कुठून कुठून शिव्या ऐकून येऊन घरीं उजळणी करीत बसतो गुलाम; पण शहरांत तरी जायचं कुठं ? कसं ? कुणाकडं ?

लग्नापूर्वी आपण किती गोडगोड कल्पना केल्या होत्या मनाशी! खेड्यामध्ये जन्म गेलेल्या आणि इंग्रजी चार इयत्ता शिकलेल्या आपल्या-सारख्या मुलीला इतकं चांगलं स्थळ मिळालं म्हणून माहेरचीं माणसं कशीं हुरळून गेलीं होतीं! आपल्याला दाखवायला न्यायच्यापूर्वी बाबांनीं विचारलं होतं—'नवरा कसा हवा?' आपण आपलं मन आईच्या मध्य-स्थीनं त्यांना कळवलं. मुलगा बाणेदार हवा. लाथ मारील तिथं पाणी काढील अशा वृत्तीचा हवा. देवानं आपलं म्हणणं ऐकलं आणि या घरांत आपण पडलों. आहेतच तसे हे बाणेदार. बी. ए. च्या परीक्षेच्या वेळीं स्वारी तुरुंगांत होती म्हणून, नाहींतर परीक्षेला बसून पहिला नंबर मिळवला असता आणि माफी लिहून द्या म्हणजे सुटका होईल, असं कितीकांनीं सांगितलं परोपरीनं समजावून यांना; पण शेवटपर्यंत कांहीं माफी लिहून दिली नाहीं यांनीं. याच बाणेदारपणामुळं परीक्षा हुकली; पण नोकरीचा वनवास मात्र मागं लागला. आठ वर्षांत तीन नोकऱ्या झाल्या. हीच नोकरी बरी टिकली म्हणायची.

लाथ मारीन तिथं पाणी काढीन—अशा वृत्तीचा नवरा मिळाला; पण जागा मिळवून घर कांहीं उभारता आलं नाहीं अजून आपल्याला! वन्संचा नवरा कुठल्याशा सरकारी खात्यांत हुद्देदार आहे म्हणे. त्यांना देखील चटकन् जागा मिळाली. वन्सं घरीं कधीं माहेरपणाला आल्या म्हणजे किती सांगत असतात नवऱ्याच्या गोष्टी एकेक. नवऱ्याला जेवाय-यला दोन दोन कसे वाजतात, सकाळपासून चहाचा हंडा कसा चुलीवर उकळत असतो, पाहुणे कसे भंडावतात, कामाला नोकर किती आहेत, रविवारीं नवरा बायको दोघं सिनेमाला कसे जातात, स्टेन्‌लेस्‌च्या भांड्यांचा सेट कसा घेतला...दगड नि धोंडे! आणि आपला तर अजून बिऱ्हाडा-चाच पत्ता नाहीं. तर कुठले नोकर नि कुठली स्टेन्‌लेसचीं भांडीं!

सीमान्त पूजनाच्या दिवशीं रात्रीं अंथरुणावर पडल्या पडल्या आपण मनाशीं खूप बेत करीत होतों. मुंबईला गेल्यावर आपलं घर सुरेख लावायचं...दाराला आकाशी रंगाचे पडदे, फरशीवर चॉकलेटी रंगीत सतरंज्या, कपड्यांसाठीं सुबक कपाट, अडीअडचणीला स्वारीचे कपडे घरीं धूवून इस्त्री करून देतां यावेत म्हणून पितळेची इस्त्री, कपबशांचा सुंदर सेट, सकाळीं चहाबरोबर पाव, नाहींतर बिस्किटं, मधल्या वेळीं स्वारी घरीं आली तर ठीकच, नाहींतर संध्याकाळीं पोहे किंवा शिरा, पहिल्या तारखेला पगार येतांच पंचवीस रुपये आपले नाहींत असं समजून बँकेंत टाकायचे, एकादे वेळीं नाटक नाहींतर सिनेमा...लग्न होऊन तीन मुलें आणि दीड वर्ष उलटलें,तरी आपण होतों तिथेंच आहोंत. नातेवाईकांची कुत्सित अनुकंपा आणि आप्तेष्टांच्या चिंतातुर मुद्रा ! मुलांच्या खस्ता आणि स्वारीच्या वागण्यांतला बेफिकीरपणा ! लग्नानंतरच्या आठ वर्षांत जर कांहीं बदल झाला असेल तर स्वारीला आतां पूर्वींसारखं घरीं यायला नको झालंय. पूर्वीं कसं, सुटी झाली, मग ती एक दिवसाची का असेना, कीं धडपडत घरीं यायचे. दिनू झाला, मग नंदा आणि मग निमा झाली आणि स्वारीनं आतां कबूल करायची नाहीं म्हटलं तर पण माया पातळ करायला सुरुवात केली. मुंबईहून कोंकण लांबच पडतं, बोटीच बंद झाल्या, तिकीटंच मिळालं नाहीं, रजाच शिल्लक नाहीं,-एक ना दोन ! मनांतून नसलं म्हणजे पुरुषांना सबबी कशा छान सांगता येतात. गेल्या वर्षीं दिनू गोवरानं एवढा आजारी होता आणि साऱ्यांच्या तोंडचं पाणी पळालं होतं. मामंजींनी देखील धीर सोडून यांना तार केली. तरी आले नाहींत ते नाहींतच, पण पुढं आठ दिवस उत्तर देखील पाठविलं नाहीं पत्राचं. मुलखावेगळं असलं कसलं काम ? आपण इतकं रागवायचं म्हणून ठरवितो पण स्वारीनं हंसून सबबी द्यायला सुरुवात केली की राग कुठल्या कुठं पळून जातो. तें कांहीं नाहीं आतां हे आले म्हणजे...

पण येतील का हे ?

इंदुमती भानावर आली. ताटलींतला भात केव्हांच संपला होता. तिनें दूर टेकडीकडं पाहिलं. घुंगरं किणकिणल्याचा तिला भास झाला; पण तो भासच होता. चंद्र मात्र ढग दूर सारून आकाशलिंबाच्या माथ्यावर आला होता. कैलासनाथाच्या मंदिरांतील घंटा वाजत होत्या. आंत देवघरांत दिनूच्या आजोबांची आरती चालली होती.

" कोण सूनबाई ! " स्वयंपाकघरांतून बाहेर डोकावत माई विस्मयानं म्हणाल्या—"लेकराला घेऊन तिनीसांजची बाहेर कां ग बाई तूं उभी? इतकी कांहीं वाट नको पहायला रघुनाथची ! "

इंदुमती एकदम लाजली आणि म्हणाली— " इश्श ! वाट कुठं बघतेंय मी.ही बया आंत किरकीर करायला लागली,म्हणून इथं चांदण्यांत बाहेर जरा मोकळ्यावर आणली तिला. सारखं सारखं बाहेर हिंडायला हवं बाईसाहेबांना. नेहमीं नेहमीं ग कोण नेणार तुला ? "

" अग कोण कशाला ! यायचे आहेत तिचे वडील, तेच दोन दिवस हिंडतील लाडक्या लेकीला घेऊन. आण इकडं तिला. दृष्ट काढतें माझ्या राणीची. "

इंदुमती दाराजवळ गेली आणि माई मीठमोहऱ्यांनीं तिची दृष्ट काढूं लागल्या.

आंतमध्यें आण्णा देवघरांत धूपार्ती करीत होते आणि पलीकडे कांबळ्यावर दिनू पालथा पडून समईच्या प्रकाशांत आईनं सकाळीं शिकविलेला धडा पुस्तक उघडून अडखळत पण मोठ्यानं वाचीत होता."न-व-रा-स-सं-प-लें-द-स-रा-उ-जा-ड-ला-मो-रू-चा-बा-प-त्या-ला-म्ह-णा-ला... "

दिनूनं एकदां मागें वळून आई—माईचा संवाद ऐकला आणि त्याच्या डोक्यांत काय आलं कोण जाणें. टुणकन् उडी मारून तो उठला आणि हळूंच आजोबांच्यामागून मोहरा करून त्यानं त्यांच्या पाठीवर एकदम्

उडी टाकली. आणि त्यांच्या पाठकुळीस लोंबकळून नि त्यांना गदागदा हलवून म्हणतो कसा– " आजोबा ' बाप' म्हणजे कोण हो ?"

"शिवलास,शिवलास ना कारट्या मला," त्याचा स्पर्श होतांच खवळून आण्णा ओरडले.–" शंभर वेळां तुला सांगितलं की मी देवापाशीं बसलों असलों म्हणजे असं आंगाशीं झोंबूं नये म्हणून;पण ऐकेल तर शपथ. दिवसभर म्हारापोरांच्या बरोबर उकीरड्यांत लोळून येत जा आणि..." आण्णांच्या आरडाओरडीचा दिनूवर कांहींसुद्धां परिणाम झाला नाहीं. खुशाल तसाच लोंबकाळून राहून तो ओणवा झाला नि हळूच आजोबांच्या उग्र पण सुरकुतलेल्या गालाचा पापा घेत तो म्हणाला--" आतां सांगाल बाप म्हणजे कोण तें ? "

त्या ओठांच्या कोमल स्पर्शाबरोबर आजोबा विरघळले आणि त्याला मांडीवर जवळ घेत खोट्या रागानं म्हणाले--"एवढं छान समजायला लागलं आहे गुलामाला. एवढा वाढला आहेस घोडा आणि तुला बाप म्हणजे कोण तें ठाऊक नाहीं होय रे ? "

" कसं ठाऊक असेल ?"-तांदूळ वेरतां वेरतां माई आंतूनच म्हणाल्या " वर्ष-सहा महिन्यांनीं सणासुदीसारखा बाप मुलांना दिसायचा. ओळख कशी राहायची आणि माया तरी कशी लागायची ? "

" हुं ! " एकदम् गंभीर होत आजोबा सुस्कारले- " नशिबाचे भोग आहेत एक एक, ते भोगलेच पाहिजेत. केव्हां एकदां चिरंजीवांना मुंबईला बिऱ्हाडाला जागा मिळायची आहे, तें एक परमेश्वरालाच माहीत ! "

अंगणांत उभ्या असलेल्या इंदुमतीनं तें ऐकलं आणि तिच्या डोळ्यांत टच्कन् पाणी आलं. तिला वाटलं, मुलांना घ्यावं आणि असंच्या असं मुंबईला निघून जावं. पण जाणार कुठं ? या जुन्या पडक्या

वाऱ्याला पाय फुटतील का? आकाशांत तरंगणाऱ्या या पांढऱ्या ढगावर फार नाहीं, फक्त तीन खोल्या घालून मुंबईला नेतां येतील का?

भाताचा हंगाम संपल्यावर भिवा आपल्या बायकोला—गौरीला—घेऊन मुंबईला गेला. नवरा बायको दोघंहि गिरणींत रोजगारावर काम करतात आणि कुठल्याशा चाळींत राहातात. पंधरा वीस माणसं एकेका खोलींत राहातात म्हणे. तसं आपण···? ·· शी!

मग ते दारावरचे निळे पडदे, त्या चॉकलेटी सतरंजा, ती स्टेन्लेस्‌चीं भांडीं, तो संध्याकाळचा शिरा...

दचकून इंदुमती भानावर आली. भास? छे, भास कुठला? गाडीवानाची ती ललकारी, बैलांच्या गळ्यांतील घुगरांचा तो नाद, ती चाकांची किरकिर...छे, तो भास नव्हता. सरडेश्वराच्या टेकडीला वळसा घालून एक धमणी धावत येतांना स्पष्ट दिसूं लागली. क्षणाक्षणाला धमणी दौडत जवळ येऊं लागली तसतशी तिच्या हृदयाची विलक्षण कालवाकालव होऊं लागली. तिची तारांबळ उडाली. माईंनीं देखील तो घुंगरांचा आवाज ऐकला असावा. कारण मधेंच त्या डोकावून म्हणाल्या "आला वाटतं रघुनाथ," आणि आजोबा म्हणाले, "ह, जा, पळ गुलामा, तुला, 'बाप' बघावयाचा आहे ना?" दिनू उड्या मारीत, "बाबा आऽलेऽ बाबा आऽलेऽ" असा गिल्ला करीत दाराकडे धांवला. आण्णा आंत वळून म्हणतात, "आल्याबरोबर चहापाणी करून इकडंच या लावून रघुनाथाला. त्या भिवा धायगुडेच्या जमिनीच्या कबुलायतीबद्दल मला काहीं सांगायचं आहे त्याला··"

इंदुमतीला अगदीं संताप आला. स्वारीचं घरांत पाऊल पडावयाच्या आधीं मामंजींच्या आपल्या कामाधामाच्या गोष्टी सुरू झाल्या. दिनू तिच्या आंगाशीं झोंबून तिला विचारत होता. "मुंबईचे बाबा मला मेक्यानो आणणार आहेत आणि नंदाला मार्तीची चित्रं आणणार आहेत,

होय ना ग आई ? " त्या अजाण मुलाला ' बाबा आले म्हणजे असं करायचं नाहीं, तसं करायचं नाहीं ' असं बजावतां बजावतां इंदुमतीची पुरेवाट झाली. माईनीं चहाचं आधण ठेवलं. इंदुमती मुलांना घेऊन दारांत जाऊन उभी राहिली-उत्कंठेनं तिचा जीव खालीवर होऊं लागला आणि धमणी वेगानं दौडत जवळ आली. अगदीं जवळ आली. समोर आली आणि क्षणभरहि न थांबतां वेगानं दौडत दौडत तशीच पुढें निघून गेली. इंदुमतीच्या साऱ्या कोमल भावना तुडवत तुडवत ती तशीच डौलानं निघून गेली. इंदुमतीनं पाठमोऱ्या धमणीकडे निरखून पाहिलें. धमणींतून दौलतराम मारवाडी कापडाच्या गाठी घेऊन मुंबईहून नुकताच परतून दुकानाकडे चालला होता.

इंदुमतीला ती निराशा असह्य झाली. आणि इतका वेळ आवरून धरलेले अश्रू तिच्या गालावरून घळघळा ओघळूं लागले.

आईच्या पोटाशीं बिलगलेला दिनू विस्मयचकित होऊन तिच्या मुद्रेकडे टक लावून पाहूं लागला. माईनीं आंतूनच पुन्हां विचारलें—

" आला का ग रघुनाथ ? "

इंदुमतीचा गळा दाटून आला, आणि " नाहीं " हे शब्द देखील तिच्या मुखांतून कसेबसे उमटले. ती उमसून रडूं लागली.

तिच्या मुखाकडे इतका वेळ टक लावून पाहात विरघळून गेलेला दिनू ममतेनं आईला बिलगला आणि बालिश त्वेषानं त्यानं विचारलं—

"–आई आई , बाबा दुष्ट आहेत का ग ? "

* * *

भों ऽ ऽ ऽ......

गिरणीचा भोंगा वाजूं लागला.—

एक हजार नउशें एकूण पन्नासाव्या वर्षातील नोव्हेंबर महिन्यानें सव्वीस ढेकरा देऊन सत्ताविसाचा जबडा उघडला. भगवान सूर्यनारायण डोळ्यांवर कातडें ओढून क्षितिजापलीकडे फूटपाथवर घटकाभर लवंडले होते. ते भोंगा ऐकतांच गडबडीनें उठले आणि किरणांनीं भरलेला कमंडलु घेऊन जीवजंतूंच्यावर उदक सोडूं लागले.

किरणोदकाची एक धार दिक्कालांतून ओघळली, ती थेट दादर स्टेशन्‌समोर ठाण मांडून उभी राहिलेल्या एका चाळीवजा इमारतीच्या दुसऱ्या मजल्यावर एका गवाक्षांतून आंत घुसली. या मजल्यावर एका युद्धकालीन खानावळीनें आपला प्रपंच मांडून, दोन घडीच्या कायम मुसाफिरांच्या आधारानें आतां चांगलेंच बस्तान बसविलें आहे. दर्शनी दारांतून आंत शिरले म्हणजे डाव्या बाजूला प्रथमच एक कौंटर दिसतो. त्यावर अनेक चोपड्या आणि नवींजुनीं वर्तमानपत्रें यांची गल्लत झालेली आहे. कडेला एक अजस्र रेडिओ सेट अहोरात्र खडखडत आहे. या कौंटरच्या मागें फाटक्या आंगाचा आणि किडक्या नजरेचा एक इसम बसलेला आहे. त्याला लोक चुकीनें मालक समजतात; पण तो फक्त मॅनेजर आहे. युद्धकालापूर्वी या खानावळींत कुणीही 'पासिंजर' चुकून माकून शिरला तरी या इसमाच्या शरीराचा काटकोन होत असे आणि मुखावर लाचारीचें हसूं आणि आर्जवीपणा उमटत असे. अलीकडे कोणीहि आंत शिरलें तरी मॅनेजर साहेब उठण्याची तसदी घेत नाहींत आणि आलेल्या आश्रयदात्याकडे एकंदरीनें ते "आतां उरलों उपकारापुरता" अशा थाटांत पाहात राहातात. कौंटरच्या मागें स्वयंपाकगृह आणि पलीकडेच भोजनगृह आहे. आचारी, पाणके आणि वाढपी कामापेक्षां एकमेकांवर अधिक तणतणतांना दिसतात तें याच ठिकाणीं. उजव्या बाजूला एक लांबलचक

बोळ असून दोन्ही आंगाला दीडखणी खोल्यांचें एक खुराडें बसलें आहे. कौंटरसमोरच्या दोन खणी खोलींत खुद्द स्वतः मालक राहातात आणि उरलेल्या खोल्यांतून ‘ कायम पासिंजर ’ भरलेले आहेत आणि ‘ भरण्याचें ’ काम अहोरात्र चाललेलें आहे.

या गृहाच्या कडेच्या आंधाऱ्या दीडखणी खोलींत ज्या चार कॉटस् मांडलेल्या आहेत, त्यांपैकीं पश्चिमेकडील कॉटचा ( आणि खिडकीचा—म्हणजे खिडकींतून येणाऱ्या मुसळधार पावसाचा, वरच्या मजल्यावरून टाकल्या जाणाऱ्या केरकचऱ्याचा आणि रस्त्यावरील वर्दळीचा—) रघुनाथ तात्पुरता ( आगाऊ मासिक रु. ७५ रोख देऊन ) धनी झाला आहे. उरलेल्या खाटाचे धनी वारंवार बदलत असतात. सध्यां एक खाट पोर्टट्रस्टमधें काम करणाऱ्या एका मद्रासी अय्याच्या मालकीची आहे. दुसरी खाट एका सिनेमाकंपनींत एक्स्ट्रॉ म्हणून काम करणाऱ्या एका म्हाताऱ्या अविवाहित नटाचे ताब्यांत आहे आणि तिसरी खाट विमाकंपनींत काम करणाऱ्या एका गोवानीज देशी साहेबानें व्यापिली आहे. आणि चार मंडळींचा हा सारा विस्तार अवघ्या दीड खणांत वर्षानुवर्षे पसरलेला आहे. बदल झाला असलाच तर किरकोळ माणसांच्यामध्यें,—माणसांच्या संख्येंत नव्हे. ही सर्व मंडळी दिवसभर दमून भागून आल्यानंतर मध्यरात्रीनंतर बिछान्यावर आंग टाकून झोंप घेण्यापुरतें (—किंवा झोंप न आल्यास तासांचे ठोके मोजण्यापुरतें—) या जागेचा उपयोग करीत असतात. येरवीं सकाळ होतांच माणसांची एकदां पळापळ झाली म्हणजे दिवसभर त्या खोलींत डासांच्याखेरीज कुणाचाहि गुंजारव ऐकूं येत नाहीं. रात्र अंगावर आली म्हणजे एक एक इसम चोराप्रमाणें हलकेच दार उघडून दुसऱ्याची झोंप न मोडेल अशा रीतीनें कपडे बदलून आपल्या आसनावर समाधिस्थ होत असतो.

या दीडखणी खोलीच्या गवाक्षांतून किरणोदकाची धार ओघळली आणि थेट तीन नंबरच्या कॉटवर झोपलेल्या रघुनाथला पुनीत करून गेली. रघुनाथ जागा झाला. डोळे किलकिले करून त्यानं आजू-बाजूला न्याहाळलें. दोन कॉट्स् तर रिकाम्या होत्या-...

... म्हणजे हा मद्रासी अय्या आणि रामभाऊ मराठे रात्रीं आलेच नाहींत कीं —

बाथरूमला क्यू लावून उभे आहेत ? रामभाऊ रात्रीं शूटिंगला गेला असेल म्हणा,पण या मद्राशाला कांहीं भल्या रामपहारीं पळापळ करायचं कारण आहे का ? हे मद्राशी असेच ! झाडूवाल्याच्या आधीं स्वतः ऑफिस-मध्यें हजर होतील आणि इतरांना उशीर झाला म्हणून ताणीत बसतील. काल रात्रीं सिनेमा आणि नंतर गप्पा.यामुळं जागरण कोण झालंय आणि...

...आणि एका कॉटवर दाढीचं सामान मांडून गोवानीज डी सिल्व्हा दाढी खरडत बसला होता. रघुनाथनें कॉटवर लोळतच चाळवाचाळव केली. दुरून कुठूनतरी ट्रॅमचा खगखग'ट ऐकूं येत होता. पलीकडे भोजन-गृहांत भाजी चिरणारा स्वयंपाकी आणि पाणी तापवणारा भय्या एकमेकांवर तणतणतांना ऐकूं येत होते. बाथरूममध्यें ललकाऱ्या घेत अभ्यंगस्नान करणारे एकांडे गोपीचंदहि गर्जत होते. बाहेर खांद्यावर पंचा नि हातांत साबण घेऊन एका विटेवर खडे राहिलेले' विठोबा ' शंखनाद करीत होते. कौंटरजवळ कोणी'पासिंजर' आपल्याला पावडर मिल्कचा चहा मिळाला म्हणून तारस्वरांत आरडाओरड करांत होता.

रघुनाथ मात्र आंथरुणांतच या कुशीवरून त्या कुशीवर लोळत पडला होता. डी सिल्व्हा किंचित विस्मयानंच ती चाळवाचाळव पाहून म्हणतो- " ए तात्या, ऊठ ऊठ ! सात वाजून गेले. हापिसला चाट मारावयाचा विचार दिसतोय तुझा.झोंप आवरत नाय तर बसावं कशाला रात्रीं इतकं जागत ? " रघुनाथनं एकदा डोळे खडखडीत उघडून गोवा-

नीज साहेबाकडे पाहिलें आणि तो फक्त किंचित हसला. पुन्हा त्यानें डोळे मिटून घेतले.—...

...— सा डे सा त वा ज ले...सा डे सा त वा ज ले ... रोजचा रघुनाथ ... रोजचा रघुनाथ टाण्कन् उडी मारून उठतो. लगबगीनें बाथरूमच्या क्यूमध्यें सामील होतो. धांवत पळत प्रातर्विधी...धांवत पळत टेबलावर येऊन पडलेला आणि निवून गेलेला गुळचट चहा गटागटा...धांवत पळत दाढी...धांवत पळत आंघोळ...धांवत पळत जेवण...धांवत पळत नऊ पस्तीसची लोकल...ऑफीसमधें आदल्या दिवशीं संध्याकाळपासून भाषांतरासाठीं येऊन पडलेला तारांचा ढिगारा ...नव्या मजकुराचीं मुद्रितें...खास अंकासाठीं भाषांतरित "आर्टिकलें" ...रोजचा रघुनाथ कामाच्या पसाऱ्यांत मुंडी खुपसून जीव गुदमरेपर्यंत ...मधेंच होमी बाटलीवाला नाहींतर रेवाशंकर,कोणी येऊन चाय पिण्यासाठीं रोजच्या रघुनाथाला ओढून नेतो. धांवत पळत इराण्याच्या हॉटेलमधील पावडरचा फेसाळ चहा...कधीं मधीं एकादें बिस्कुट, नाहीतर पाव... इराण्याऐवजीं उपहारगृह असलें तर एकादी मिसळ...कीं धांवत पळत येऊन पुन्हां टेबलापुढें हजेरी...तारांचीं भाषांतरें,नव्या मजकुराचीं मुद्रितें... खास अंकासाठीं भाषांतरित"आर्टिकलें"...मधेंच साहेबांचें बोलावणें... ...बोलावणें म्हटलें कीं पांचावर धारण...एकदोन चुका, चारदोन कडक शिव्यांचा डोस...पुन्हां तेंच काम, तींच मुद्रितें, तींच भाषांतरें ...चहाचे ठोके, कीं थकलीं शिणलीं गात्रें जरा ताजीतवानीं...दमलेलीं शरीरें कळपांतून निःश्वास टाकीत कचेरीच्या बाहेर...लोकल पकडण्या-साठीं धांवत पळत...धांवत पळत होमीबरोबर पिक्चरला...नाहींतर रेवाशंकरबरोबर चौपाटीवर...नाहींतर एकटेच गेट वे ऑफ इंडियापाशीं आंधार पडेतोंपर्यंत...पोटभर वायफळ गप्पा...विश्वाचें राजकारण... रात्र आंगावर येताच धांवत पळत लोकलनें पुन्हा खानावळींतल्या

खोलींत...मॅनेजरबरोबर थोड्या छाकट्या गप्पा...मालकाबरोबर थोडी ताजी बातमी...गपा गपा गपा गडबडीनें जेवण...कीं श्रीजचा जल्लोष ...श्रीजचा जल्लोष डोळे शिणेतोपर्यंत...आणि मग रोजचा रघुनाथ युगायुगांच्या करकरणाऱ्या खाटेवर, मावळलेला दिवस सुखरूप पार पडल्याबद्दल देवाचे आभार मानीत निद्रेच्या आधीन...

कीं उद्यां सकाळीं नऊ पस्तीसची लोकल...

थोडी थोडकी नव्हेत, आठ वर्षें धांवत पळत जगतोय रोजचा रघुनाथ...ठरलेल्या वेळीं रोजचा रघुनाथ ठरलेल्या कंपूबरोबर ठरलेल्या जागीं...यांत खंड पडलाच तर वर्षसहा महिन्यांनीं स्वारीला कधीं रजा मिळून घरीं जाण्याची हुक्की आली तर...नाहींतर खानावळींतल्या वस्तींत चिकटलेल्या मलेरियानें हल्ला चढविला अगर चौपाटीवर खाल्लेली भेळ बाधली किंवा कुठेंतरी कंटाळून संध्याकाळची राइसप्लेट आंगावर उलटली तर रोजचा रघुनाथ अंथरुणावर आडवा होतो. त्यावेळीं...तापानें फणफणलेला वा आमांशानें हैराण झालेला रघुनाथ कण्हू लागला म्हणजे एकदोन दिवसांनीं मॅनेजर येऊन चौकशी करून जातात. ...कैद्याप्रमाणें रुग्णाईत पासिंजराच्या अन्नांत किरकोळ बदल करण्यांत येतो ...या उप्परहि आजार चिटकून राहिलाच तर एक किडका डाक्तर येऊन पेशंटला तपासून जातो, ( आगाऊ पैसे वसूल करून ) वेळप्रसंगीं सुई टोंचून वा औषधानें बाटली भरून पाठवून देतो...आणि मग रोजचा रघुनाथ पांघरुणांत तोंड खुपसून घुसमटून पडून राहातो तों आजार संपून तो पुन्हां हिंडता फिरता होईपर्यंत...मधें चहा कॉफी लागली तर खालच्या उपहारगृहांतून मागवावी...आंग ठसठसूं लागलें तर खानावळींतल्या पाणक्याला बक्षिसी देऊन आंग रगडून घ्यावें आणि पलीकडील खोलींत चाललेल्या दंगाधोप्याचा अगर शेजारच्या कॉटवर पडलेल्या पासिंजराला आलेल्या गाण्याच्या हुक्कीचा उपद्रव वाटू

कामाला वर स्वतःचे-कान झांकून घ्यावे...पडून राहण्याचा कंटाळा आलाच तर...!

पण कंटाळा येईल कसा ? थोडीथोडकीं नव्हेत, आठ वर्षे हा कार्य-क्रम चालला आहे. गात्रें न् गात्रें, शरिरांतील कण न् कण अगदीं वरणींतल्या लोणच्याप्रमाणं मुरून गेले आहेत. आजारांतून उठतांच डाक्टर सल्ला देतात कीं हवापालट केला पाहिजे, पौष्टिक अन्न घेतलें पाहिजे आणि टॉनिकच्या बाटल्या ढोसल्या पाहिजेत; पण रोजच्या रघुनाथला माहीत आहे कीं ही डाक्टरमंडळी लबाड आहेत...रोजच्या रघुनाथाला महिन्याच्या पहिल्या तारखेला तीस रुपये कोंकणांत घरीं पाठवावे लागतात...तर कुठला हवापालट नि कुठलें टॉनिक ? ... रोजचा रघुनाथ पुन्हा धांवत पळत जगूं लागतो...... असा धांवत पळत जगणारा रघुनाथ साडेसात झाले तरी आंथरुणांतच घुसमटत पडला होता. आळसटून रघुनाथनं पाय तणगावले, तोंच पायाच्या आंग-ठ्याचें नख चुकून पायथ्याशीं भिंतीला टेकून ठेवलेल्या उघड्या सारंगीच्या उरलेल्या अखेरच्या तारेस लागलें.

" किण्...किण्...किण् "

सारंगीची तार किणकिणली.

दूर दूर कोठें सुकलेल्या स्मृति झरझर मोहोर येऊन पालवल्या. थिज-लेल्या आठवणी एकाएकी जळत्या मेणबत्तीप्रमाणें पाझरूं लागल्या. मिटलेल्या डोळ्यांपुढें एक एक प्रसंग भावनांच्या सप्तरंगांत कथ्थक नृत्य करीत येऊं लागला.

...जांभळीला खोतांच्या जुनाट खानदानी वाड्यांत छोट्या बाळासाहे-बांच्याबरोबर खेळण्यासाठीं गांवांतले बालगोपाळ जमून लपंडावाचा खेळ रंगांत आला आहे.खुद्द आबासाहेब शिकारीसाठीं रायबागला गेले असल्या-मुळें जमलेल्या मुलांनीं वाडा डोक्यावर घेतला आहे.छोटा रघुनाथ लपण्या-

साठीं एका दालनांतून दुसऱ्या दालनांत पळत पळत चालला आहे. दालना-मागून दालनें ओलांडत तो एका अंधाऱ्या महालांत प्रवेशतो आणि चपापून थबकतो. या महालांत सर्व प्रकारचीं देशी विदेशी वाद्यें भिंतींना लावून ठेवलेलीं आहेत. उभ्या इवल्याशा आयुष्यांत एवढें प्रचंड वाद्यागार प्रथमच दिसल्यानें गानवेडा रघुनाथ खेळ विसरून वाद्यें न्याहाळूं लागतो, हळू हळू तंबोरा, सतार, सारंगी बीन, इत्यादि वाद्यांशीं भीतभीत तो सलगी करूं लागतो नुसत्या टणत्कारानें अंगावर रोमांच उभे राहतात, गात्रें वेडीं होतात, कणाकणांतून उन्माद ओसंडूं लागतो. स्थळकाळाचें भान हरपतें. सारंगीवर कधीतरी कुठेंतरी पाहिल्याप्रमाणें बोटे फिरूं लागतो. वेडे वांकडे स्वर उमटतात. पण तेवढ्यानेंहि ब्रम्हानंद होतो. तेवढ्यांत—

खुद्द आबासाहेब प्रवेशतात. छोटा रघुनाथ चमकतो, चपापतो, थरथर कांपूं लागतो. शीघ्रकोपी आबासाहेब पुढें येतांच पाय लटपटत छोटा रघुनाथ अडखळत भेदरून समर्थन देऊं लागतो. पण काय आश्चर्य? आबासाहेब गुरकावत नाहींत, रागावत नाहींत किंवा हातांतल्या छडीनें झोडपण्या-साठीं पुढें धांवत नाहींत. प्रेमानें, कौतुकानें रघुनाथला जवळ घेतात. त्याला बो कसा धरावा हें शिकवितात. एक दोन सूर शिकवितात. त्या दिवसाचा पहिला धडा संपतो. त्यानंतर छोटा रघुनाथ खोतांच्या वाड्यांत वारंवार जाऊं लागतो. आवडत्या सारंगीवर थोडें थोडें प्रभुत्व मिळवूं लागतो. एकादी गत वाजविण्याइतकें बोटांत बळ येऊं लागतें. खोतांच्या वाड्यांत झडणाऱ्या गायन वादनाच्या मैफली आतां त्याला रात्रीं आपल्या घराच्या परसांत उभे राहून ऐकाव्या लागत नाहींत. आबासाहेबांचा लाडका पाहुणा म्हणून तो थेट त्यांच्याशेजारीं बसलेला असतो. कितीतरी सारंगिये इथेंच त्याला ऐकायला मिळतात. आबासाहेब छोट्या सारं-गियाची त्यांना करामत दाखवितात. छोटा सारंगिया स्वप्नांचे ताबूत उभारूं लागतो.

आणि एक दिवस आबासाहेबांच्या वाड्याचीं दारें बंद दिसतात. गाण्याच्या छंदापायीं कर्जबाजारी आबासाहेबांच्या घरादाराचा लिलांव मांडला जातो. त्यांतच साऱ्या वाद्यांची धिंड निघते. रघुनाथच्या आवडत्या सारंगीची देखील. छोटा सारंगिया घरीं येऊन ओक्साबोक्सी रडतो.

पहिला प्रसंग वितळून जातो तोंच रघुनाथच्या डोळ्यांसमोर दुसरा प्रसंग उभा राहिला....

...पावसाळ्याच्या आरंभीं हायस्कूलमधें जाणाऱ्या कुमार रघुनाथचा रस्ता अप्पा बळवंत चौकांतून जातो. या चौकांत पुण्यांतील कांहीं नामांकित वाद्यांचीं दुकानें थाटलेलीं आहेत. शाळा सुटल्यानंतर संध्याकाळीं घरीं परततांना रघुनाथाचे पाय या भागांत घोटाळूं लागतात. सतार सारंगीचे खुंट्या पिळून स्वर लावणारे आणि हार्मोनियम ऑर्गनची मिजास पाहाणारे कामगार राबत असलेले पाहून त्याला भरतें येतें. रोजच त्याची पाऊलें इथें रेंगाळतात आणि मग चुलत्याच्या घरीं उशीर झाल्याबद्दल त्याला बोलणीं खावीं लागतात. दुकानांत उंच आसनावर लठ्ठ पोटाचे निमिशाळ चेहऱ्याचे एक गृहस्थ नेहमीं बसलेले असतात. त्यांना या मुलाचें कुतूहल वाटतें. एक दिवस ते त्याला दुकानांत बोलावतात. त्याची चौकशी करतात. थोड्या ओळखीनंतर रघुनाथाच्या हातीं एक नवीन सारंगी येते. तो आपली ठेवणींतली गत त्यांना वाजवून दाखवितो. मिशाळ गृहस्थ खूष होतात आणि मग शाळा सुटल्यानंतर दुकानांत बसून सारंगी बजावण्याचा रघुनाथचा रोजचाच कार्यक्रम होतो.

इथेंच एक दिवस उस्ताद गुलामअली सारंगी खरेदिण्यासाठीं येतात. त्यावेळीं हा छोटा सारंगिया त्यांना दाखविण्यांत येतो. पोराच्या हातांतली सफाई, सहजपणा आणि बोटांची झिलई पाहून उस्ताद खूष होतात. त्याला घरीं घेऊन जातात. उस्ताद मूळचे लाहोरकडचे; पण त्यांची लाडकी लेक पुण्याला आजारी झाल्यानें ते इथें मुक्काम करून आहेत. रघुनाथ

नियमानें उस्तादांच्या तालमींत संथा घेऊं लागतो, मेहनत करूं लागतो. हात सफाईनें चालूं लागतो; बोटांतून उमटणारे रांगडे स्वर आतां डौलदार, घाटदार आणि स्वच्छ होतात. राग–रागिण्यांचा विलास आत्मविश्वासानें होऊं लागतो.

आणि एक दिवस उस्तादांची लाडकी लेक वारते आणि उस्ताद दुःखभरानें लाहोरला परत जाण्यासाठीं निघतात. रघुनाथला ब्रह्मांड आठवतें.

उस्ताद जाणार म्हणजे त्यांची विद्या जाणार. त्यांच्याबरोबर त्यांची सारंगी जाणार. रघुनाथ अंतःकरणापासून हादरून जातो. त्याचें खाण्यापिण्यावरून आणि अभ्यासावरून चित्त उडतें. तास न् तास तो बावचळल्यासारखे काढूं लागतो.

सारंगीचा त्याला लोभ सुटतो आणि शोकनिमग्न झालेल्या उस्तादांना फसवून सारंगी चोरण्याचा विचार त्याच्या मनांत घर करून राहतो. अखेर उस्ताद जाणार त्याच्या आदल्या दिवशीं मनांत बेत पक्का योजून तो त्यांचे घरीं जातो आणि—

उस्ताद त्याला पाहतांच आपली सारंगी काढतात. आणि आपली आठवण म्हणून त्याला बक्षीस देतात. रघुनाथ विरघळून जातो, त्याचे डोळे भरून येतात. उस्तादांना वाटतें कीं हें वियोगदुःखच आहे. ते त्याची समजूत काढूं लागतात. रघुनाथला भडभडून येतें आणि लहान मुलाप्रमाणें रडत तो आपला अपराध त्यांना सांगतो. उस्ताद त्याच्या अपराधानें रागावण्याऐवजी सारंगीवरील त्याचें प्रेम पाहून गहिंवरून येतात. सारंगी तर त्याला मिळतेच, पण उस्तादांचा उदंड आशीर्वादहि त्याला लाभतो...

तीच ही सारंगी !

या सारंगीनें शाळेंत त्यानें अनेक चढाओढी जिंकल्या. कॉलेजमध्यें अनेक सम्मेलनें गाजविलीं. सिंहगडावर झालेल्या जुगलबंदींत रत्नमाला

शिरोडकरशी त्याची मैत्री झाली. या सारंगीच्या सहवासांत त्यानें अनेक स्वप्नें उभारलीं.

आणि एक दिवस बेचाळीसची चळवळ उद्भवली. त्याच्या डोक्यांत निराळेच विचार वाहूं लागले आणि तो अचानक भूमिगत झाला. कुठूनकुठून त्यानें लिहिलेलीं पत्रकें प्रसिद्ध होऊं लागलीं. कार्यकर्त्यांच्या गुप्त कार्यक्रमांत तोहि अविश्रांत खपूं लागला आणि एक दिवस अचानक पोलीसांच्या हातीं तो गंवसला. तुरुंगांतून सुटून तो बाहेर आला तेव्हां त्याचें जग कितीतरी बदलेलें होतें. शिक्षण सोडून कामधंदा बघण्याविषयीं त्याला वडिलांचें पत्र आलें होतें. घरीं त्याच्या लग्नाची खटपट जोरानें सुरू झाली होती.

आणि त्याची सारंगी ? तो तुरुंगांत गेल्यानंतर चुलत्यांच्या घरीं बेवारशी प्रेताप्रमाणें तिची दशा झाली. पोरासोरांनीं तिचें भरपूर खेळणें करून घेतलें होतें. तुरुंगांतून सुटून आल्यानंतर रघुनाथनें सारंगी दुरुस्त करून घेतली आणि नोकरीसाठीं तो मुंबईला आला, तेव्हां मेहनत करण्याच्या इर्षेनें सारंगीहि त्यानें बरोबर आणली.

त्यानंतर त्याचें लग्न झालें.

त्याला तीन मुलें झाली.

आणि आठ वर्षें उलटली.

युद्ध आलें आणि गेलें; पण आणलेली सारंगी जी कोपऱ्यांत पडून राहिली तिच्यावर कांहीं पुन्हां स्वर उमटले नाहींत. खानावळींतल्या वास्तव्यांत सारंगी वाजविणार कुठें आणि केव्हां ? आणि आतां खानावळींतलें अन्न खाऊन खाऊन घरच्या अन्नाची जशी चव गेलीय तशीच छापखान्यांतले आवाज ऐकून सारंगीच्या स्वरांचीहि चव त्याला उरलेली नाहीं. शेवटीं वर्तमानपत्र कचेरींतल्या तारा तेवढ्या राहिल्या

रघुनाथच्या हातांत आणि खानावळींत पडलेली सारंगी घेतली नव-शिक्यांनीं हवीतशी हाताळून.

त्या सारंगीच्या तारा तुटल्या. उरलेल्या एकुलत्या एका तारेला गंज चढला. बो ची केसाळ दोरी उंदरांनीं खाल्ली आणि म्हातान्या बाईप्रमाणें त्या औटघटकेच्या संसारांत सारंगीबाई निकामी होऊन कोपऱ्यांत धूळ खात पडली.

रघुनाथनें पडल्या पडल्या उगीचच पायानें चाळा करीत सारंगीची तार नखानें पुन्हां छेडली...

किण्...किण्...किण्...

०००...किण्... किण्... किण्...

किण् किण किण.
किणकिणते म्हातारी सारंगी.
गुलगुलते पडक्या भिंतीच्या वृद्ध कोपऱ्याशीं
जयाचे मुखीं झाडल्या शाईचे असंख्य दिसती देवींचे व्रण.
सांगते सारंगी फुटक्या पोटींचें तिष्ठलें दुःख.
तुटक्या तारा, पिचके सूर,
मोडक्या खुंट्या, पडके दांत.
कुरकुरत करीती साथ.
नादब्रह्माच्या भोपळ्यांत माजे अन्नब्रह्मासाठीं झुरळांची वस्ती.
खुंट्यांच्या गुहेंत ढेकणांचीं अंडीं.
फिरली जेथें शैशवकाळीं कोमल बोटें.
नाचती तेथें निर्धास्तपणें पुष्ट उंदीर.
कोमल बोटें चरबटूनी राठ जाहलीं.
किरट्या किरट्या कारकुनींत,
किंवा करीत ताज्या बातम्या भाषांतरीत.

राठ जाहलीं कोमल बोटें.
राठ जाहलें कोमल मन.
अंतरांतल्या नाजुक कल्पना, साजूक भाव, चोरट्या इच्छा
(-जयांना म्हणती शाळकरी पोरें महत्वाकांक्षा-)
परीस्थितीच्या प्लॅस्टरमध्यें
पोलाद जाहलें आंतलें स्नायू.
पोलाद जाहल आंतलें मांस.
पोलाद जाहल्या पांढऱ्या तांबड्या रक्ताच्या पेशी.
पोलादी पुरुष.
धांवतो पळतो.
धांवतो पळतो—
धापा टाकीत, उद्घाम होत.
टिपें गाळीत, रक्त ओकीत
कोणत्या मुक्तीच्या दिव्य ध्येयासाठीं ?
अन्नब्रह्माच्या आराधनेसाठीं ?
—मात्र कधीं कधीं
(-वर्षां वर्षांतुन एकदांच येते अशी गंगामाई)
दूर कोठेंतरी खोल गाभाऱ्यांत
पाऱ्यासारखें शीतळ पातळ
मऊ मऊ आणि शीतळ तेजाळ
टपके मधेंच रक्ताळ हृदय
जयाचे डाग वाळले सुकले
उरती मागून कित्येक दिवस
कठीण काळ्या पोलादावरी
पुसट पुसट...
भोंऽऽऽ...

दुसरा भोंगा झाला आणि पांघरुणांत गुरफटून पडलेला रघुनाथ पांघरूण दूर सारून गडबडीनें उठला.

रात्रीच्या जागरणाचे चोचले आतां आवरले नाहींत तर नऊ पस्ती-सची लोकल चुकायची या भयानं गडबडीनं त्याची धांदल सुरू झाली. खांद्यावर टॉवेल आणि हातांत साबणाची पेटी घेऊन त्यानं हातरुमाला-साठीं हँगरवर लटकलेल्या कोटाच्या खिशांत हात घातला. हातरुमाला-बरोबर दोन पिवळे लिलाफे खिशांतून खालीं पडले. ते उचलण्यासाठीं रघुनाथ खालीं वाकला. डी सिल्व्हा म्हणतो–" खुषींत दिसतेय स्वारी आज ? घराकडून पत्र आलेलं दिसतंय ? "

" घराकडून ? छे. एक आहे रेंट कंट्रोलरचं आणि दुसरं आमच्या साहेबांचं. हुकूम आहे तीन दिवस रजा मंजूर झाल्याचा. "

" मग काय चैन आहे. कुठं गांवीं जाणार काय ? "

" हूं ! घरीं जावं म्हणतोय. कंटाळा आला आतां. गेल्या सबंध वर्षांत जवळ जवळ घरीं गेलों नाहीं. प्रत्येक सुटीला आपली ऑफिसची कांहीं भानगड उपटतेच. म्हटलं आतां रजा घेऊनच गेलं पाहिजे. काम, काम, काम चोवीस तास काम, बारा महिने काम ! अरे काय, बायका पोरं आहेत कीं नाहींत आम्हांला ? "

" आणि रेंट कंट्रोलर काय म्हणतोय ? आहे का जागेची आशा ?"

रघुनाथनं मानेनेंच नाहीं म्हटलं.–" आठ वर्षांत माझ्या अर्जाचा नंबर १७३६ वरून ८२४६ वर आलेला आहे. या गतीनं आणखी दोन पिढ्या खतम झाल्या तरी जागा मिळायचं कांहीं लक्षण दिसत नाहीं. "

पत्र पुन्हां खिशांत घालून रघुनाथ बाहेर पडला. समोर बाथरूम नुकतीच रिकामी झालेली त्याला दिसली. पळत पळत जाऊन त्यानं तिचा कबजा घेतला...

...हो करतां काय, नऊ पस्तीस सांपडली नाहीं तर आहेच ऑफिसमध्यें तासपट्टी...या रेंट कंट्रोलरला एकदां या इथं महिनाभर सक्तीनं ठेवला पाहिजे...आणि लिहितोय लेकाचा कीं, ' आय ॲम ग्लॅड

टु इन्फॉर्म यू...नुसती शब्दांचीं कोरडीं पानं...कोंकणांत जायची दगदग आणि यायची दगदग...झक् मारली आणि लग्न केलं...आण्णांना आणि आईला सुनमुख आणि नातवंडांची तहान लागली होती ना...बसा म्हणावं आतां सून आणि नातवंड करीत...हा गोवानीज पहा...हा सहा वर्षांत मुंबईच्या बाहेर फिरकला नाहीं...पैसे मिळवावे आणि चैन करावी...आहे कुणाची जबाबदारी? नाहींतर चाललींच आहेत इंदुमतीचीं पत्रावर पत्रं......

गडबडीनें स्नान आटोपून तो बाहेर पडला. हॉटेलमधून "पेशल चाय" मागाविण्याचा त्यानं मॅनेजरसाहेबांना हुकूम दिला. खोलींत येऊन गडबडीनं त्यानं केस विंचरले आणि त्यानं कपडे केले. तोंपर्यंत नऊ वाजून गेले. हॉटेलातून आलेला पेशल चाय त्यानं गटागटा ढोसला आणि लागलीच भोजनगृहांत येऊन तो पानावर बसला.

चार दोन ओळखीचे चेहरे आसपास दिसले. नेहमींप्रमाणें दंतपंक्ति विचकून हवापाण्यावर गप्पा मारीत रघुनाथ जेवण्याचें कोष्टक भरूं लागला—

...जेवणाचें कोष्टक...जगण्याचें कोष्टक. .जगण्याचें कोष्टक साधें आहे. जाहिरातीच्या कोष्टकाइतकें गुतागुंतीचें नाहीं...अर्टीकल–तारांचा भाषांतऱ्या = दिवसभर धांवपळ,एकशें पंचवीस रुपये पगार...उपसंपादकाची खुर्ची = तीनशें रुपये पगार, कमी काम, जास्त रुबाब, लोकल गाडीचा पहिला वर्ग...सहसंपादकाची जागा=पांचशें रुपये पगार, पागडी भरण्याची ऐपत, छोटीशी मोटर, वर्तमानपत्रावर छापून नांव, रहायला छोटीशी जागा...

छो..टी..शी..जा..गा..

छोटीशी काय,उद्यांच्या अंकांत इंचभरदेखील जागा नाहीं.सगळा अंक पंतप्रधानांच्या अमेरिकेंतील भरगच्च कार्यक्रमानें भरून गेला आहे......

ऑफिसमध्यें तारांचा खच पडला आहे. ...संध्याकाळपर्यंत मजकूर तयार झाला पाहिजे...प्रुफें संपलीं पाहिजेत...रोजचें टपाल तयार होऊन साहेबांच्या सह्या झाल्या पाहिजेत, तर तिथून सुटका आणि पांच दहाची गाडी...०००

समोरचा चष्मेवाला आमटीचा भुरका मारून विचारतो- " काय हो, पाकिस्तानशीं युद्ध होणार असं ऐकलं, खरं काय ?"

रघुनाथ भानावर येऊन--

...युद्ध ? आली का मधें कांहीं भानगड ? युद्ध करणार असले तर म्हणावं हा एवढा आठवडा जरा कळ काढा...आमची रजा संपू द्या. मग घाला हवा तो गोंधळ. आतांच युद्ध उद्भवलें म्हणजे रजेचीं भरलींच शंभर वर्षें...मग बसले आहेत ऑफिसमध्यें रात्रीचे दिवे जाळीत...

--म्हणाला. " कांहीं रंग दिसत नाहीं तसा. "

...मागं आपण महाबळेश्वरला जायला निघालों आणि महात्माजींचा वध झाला...साऱ्या कार्यक्रमाचा विचका...चार दिवस बसलों होतों कोण काय म्हणाला नि कोणाला काय वाटलें तें खरडीत...दमून भागून परत यायला रात्रीं बाराबारा वाजायचे...गोवानीज बसला होता तीन दिवस ओक्साबोक्शीं रडत...इथें ऑफीसमध्यें येऊन पाहा म्हणावं या दुःखप्रदर्शनाचें सार्वजनिक भाषांतर करून...चट साऱ्या रडण्याची वाफ होऊन जाईल...धबधब्यापुढें टीचभर अश्रू उमटायला तर पाहिजेत ...... रघुनाथ गडबडीनें उठला आणि आंचवून ऑफिसला जाण्यासाठीं कपडे करूं लागला.

--टेस्ट मॅचचा वृत्तांत अर्धवटच पडला आहे अजून...

आजच्या अंकांत गेला नाहीं तर साहेब ठणठणाट करणार...दोन दिवसांपूर्वींच संपली असती कीं कसें एका कॉलममधें आटोपलें असतें सारें ? पण हा विजय हजारे आहेना दोन दोन शतकें काढून आमच्या

बोकांडी बसायला !... क्रिकेटफील्डवर हजारे आणि रीगलमधे हॅम्लेट, अगदीं ठाण मांडून छळायला बसले आहेत आम्हांला !...साहेबांनीं छप्पन्न कात्रणं पाठवून हॅम्लेटवर रविवारच्या अंकांत खास अर्टीकल जाऊं द्या म्हणून हुकूम सोडला आहे.तेवढ्यासाठीं तर परवां हॅम्लेट दुसऱ्यांदा पाहिला पण सिनेमापेक्षां तिथं दुसऱ्याच जमतीगमती झाल्या ! छे, आपण मारी डिसूझाला त्या दिवशीं नेलं नसतं बरोबर तर बरं झालं असतं. आतां पिक्चरवर अर्टीकल् कोण तिचा काका येऊन लिहिणार आहे वाटतं ?... काका...मारीचा काका...बाकी तिचा काका आहे हॅम्लेटच्या बापाच्या भुतासारखा...नेहमी शिकारीच्या गप्पा...ऐकून किटले आतां कान ...मारीला आता मात्र सांगायचं-" ए छोकरी, तुझा तो शिकारीबुवा घरांत नसेल तर मी येईन..."

रघुनाथानं छोटी बॅग घेतली आणि तो खानावळीच्या खोलींतून बाहेर पडला. नऊ पस्तीस गाठण्यासाठीं 'कायम पाशिंजरांत' आधींच पळापळ उसळली होती त्यांत तो सामील झाला. धांवणारीं माणसें आणि पळणारीं वाहनें यांच्याशी आट्यापाट्या खेळत जीव मुठींत धरून तो रस्त्यांतून घाईनें चालूं लागला. क्षणाक्षणाला नवे चेहरे, नवे आकार, नवे नवे आवाज बेपर्वाईनें मुसंडी मारीत जात होते. फूटपाथवरून जातांना रघुनाथचें लक्ष दोन भव्य दुकानांच्याआड दडलेल्या एका चाळीच्या दाराकडे गेलें. दाराशीं एक म्हातारे गृहस्थ सचिंत उभे होते...

...कोण तात्याबुवा ? आणि असे रिकामे ? रस्त्यावरील वर्दळ पाहात उभे ? छे, दुसरे कोणी असतील. नव्हे तेच ! तीच ती बाराबंदी, तेंच तें मळकट धोतर, त्या करड्या भरदार मिशा आणि उग्र मुद्रा, तो डोळ्यां-वर जाड भिंगांचा जुनाट चष्मा...पण हातांत पुस्तक जाड नाहीं ! ऐति-हासिक कागदपत्रांचे भारे नाहींत ! जुन्या पोथ्या आणि काव्यें यांचीं हस्तलिखितें नाहींत ! मग हे तात्याबुवा कसे ? आणि इथें रस्त्यावर

कसली गम्मत न्याहाळत उभे आहेत? स्वारी तिसऱ्या मजल्यावर एका नातेवाइकाच्या घरीं एका खोलींत आपला इतिहासाचा आणि व्याकरणाचा प्रपंच मांडून अहोरात्र कागदपत्रांच्या चोपड्यांत मुंडी खूपसून बसलेली असते. तीस वर्षें झालीं म्हणे. मागें स्वतःचा संसार नाहीं, कसल्या उपाधी नाहींत, आयुष्यांत कसली गम्मत नाहीं. हस्तलिखितांचे भारे आणि आपण, अहोरात्र गोंधळ चाललेला असतो आणि मग कधींतरी "यादवकालीन मराठींतील षष्ठीची उत्पत्ति" नाहींतर असलेंच कांहीं जडजंबाल लेख बाहेर पडायचे. लेख ले.. ख... अरे खरंच ? तात्याबुवांचा कसला तरी लेख यायचा होता रविवारच्या अंकासाठीं...आहेतच उभे इथें विचारूं या त्यांना... त्यावांचून कांहीं अडलें आहे अशांतला भाग नाहीं...पण तेवढेंच... तात्याबुवाच्यापाशीं येतांच रघुनाथनें त्यांना हंसून नमस्कार केला. तात्याबुवा कसल्या तंद्रींत होते कोण जाणे. त्यांनीं तिकडे पाहिलेंच नाहीं. रघुनाथ म्हणतो—" नमस्कार तात्याबुवा."

तात्याबुवा दचकून भानावर येतात आणि नमस्कार करतात.

" कोण तुम्ही देसाई नव्हे का ? त्या मानवता कचेरींत काम करतां नव्हे ? तुमच्या संपादकांना मी लेख द्यायचं कबूल केलं होतं वेदांतील छंदाबद्दल.—"

" होय, त्याचविषयीं विचारायला आलों होतों मी. "

" अहो तेंच तर सांगतोंय. कसला लेख आणि कसला काय ! डोळे पांढरे व्हायची पाळी आलीय माझी. डोक्यांत किडे पडले आहेत विचार कर करून. "

" पण झालं काय इतकं डोकं पिकायला ? "

"अहो आमचे मावसबंधू अप्पासाहेब—" रघुनाथ ओळखल्याचा भाव दाखवितो—"त्यांच्या घरीं आज पंचवीस वर्षें राहतोंय मी आणि आतां त्यांच्या मुलीचं लग्न ठरलंय तर खोलींतून बिऱ्हाड उचलायला सांगताहेत

मला. जांवयाला जागा नाहीं म्हणून घरीं ठेवून घेणार आहेत म्हणे. सांगा आतां, एवढीं लाख मोलाचीं हस्तलिखितं, ऐतिहासिक कागदपत्रं आणि जुना दुर्भिळ ग्रंथसंग्रह घेऊन मी जाऊं कुठं ? ”

“ आमच्या खानावळींत तात्पुरती एकादी कॉट मिळूं शकेल तुम्हाला. ”

“ कॉट ! उभ्या आयुष्यांत कांबळयावर पडलेल्या मला कॉट हो काय करायची आहे ! मी काय कुठंहि छपराखाली पडेन. प्रश्न माझा नाहीं हो, माझ्या कागदपत्राचं आणि ग्रंथसंग्रहाचं काय करूं मी ! ”

रघुनाथ सहजगत्या म्हणून जातो--“ त्यांत काय एखाद्या गोडाऊन-मध्यें नाहींतर एकाद्या वखारींत....”

तात्याबुवा एकदम उसळून म्हणतात–“ गोडाऊनमध्यें ! वखारींत ! वा, वा ! वर्तमानपत्राची न खपलेली रद्दी समजलां काय ती ! अहो प्राणापेक्षां अधिक जपलेले कागदपत्र आणि हा संग्रह माणसाच्या मोलानं मोजतां काय ! माणसं काय फुटपाथवर देखील पडूं शकतात. त्यांना काय कसरी खातात ? पावसापाण्यानं माणसं काय कुजतात ! जळती ठिणगी पडल्यानं काय माणसं जळतात ? आम्ही फूटपाथवरच पडायचे आतां ! पण या दुर्मिळ संग्रहाची वाताहात झाली म्हणजे वीष खाऊन हा तात्याबुवा मेलेला दिसेल या जगाला... ”

गाडी दूरवर ओरडल्यासारखें वाटल्यावरून रघुनाथरावानें तात्या-बुवांचा गडबडीनें निरोप घेतला आणि तो स्टेशनच्या रोखानें घाईनें जाऊं लागला....

स्वतःच्या प्रपंचापेक्षां कागदपत्रांच्या आणि ग्रंथसंग्रहाच्या निवाऱ्याची चिंता करणारा आहे कीं नाहीं अजब वेडा ? एकादा राजवाडा स्वारीला बक्षीस दिला तर तिथं हा अजबखाना मांडून, स्वारी बाहेर व्हरांड्यांत पडायची!...वेडा...वेडा...जिवापेक्षां प्यार असलेलीं वेडं!...आपणदेखील

एका काळीं असेच वेडे होतों. गाण्याचें वेड...देशसेवेचें वेड...पण हें वेड पंचवीशींतलें...हे पंख पंचवीशींतले...पंखधारी वेडे...या म्हाताऱ्याचे पंख काय पण वेडेवांकडे भरमसाट वाढले आहेत...जन्मांतून एकदां तरी हा प्राणी ' पंख-कर्तनालयांत ' गेला होता कीं नाहीं कोण जाणे !... आपले पंख कसे छाटून छाटून गुळगुळीत...अगदीं घोटून केलेल्या दाढीसारखे...पंख ठेवलेच तर कसे माफक 'फ्रेंच कट्'सारखे...स्टेशनांत गाडी ओरडली तेव्हां रघुनाथ पुलावरून प्लॅटफॉर्मकडे पळत सुटला.गाडी पकडण्यासाठीं जीव उद्घाम झाला नि धाप लागली; पण तो पळाला म्हणूनच त्याला गाडी सांपडली. गाडी सुटतां सुटतां दांड्याला धरून सफाईनें त्यानें आत उडी मारली आणि दारांतल्या गर्दींत उभे राहण्यापुरती खेंचाखेंच करून तो तिष्ठत राहिला. त्या खेचाखेचींत त्याला क्षणभर गुदमरल्यासारखें झालें; पण गुदमरण्याची ही रोजची संवय.

... गु द म र ण्या ची सं व य ...

गुदमरण्याची झिंग चढली म्हणजे या मुंबईत कामानें कांठोकांठ भरलेला दिवस कसा झट्कन् रिता होतो तें कळतदेखील नाहीं. प्राणायामासारखा गुदमरण्याचा देखील एक अभ्यास आहे. एक शास्त्र आहे...आठ वर्षांच्या संवयीनें गुदमरण्याचा काय पण वेग साधला आहे... साहेब शिफारसपत्रांत म्हणतात...श्री. देसाई उत्कृष्टरीतीनें गुदमरून जाऊन दिवसाचे दिवस काम करूं शकतात. हें त्यांचें ठळकदार वैशिष्ट्य आहे.

—ही रोजची संवय त्याच्या आंगवळणीं पडली होती. शेकडों जणांचे उष्ण श्वास—

...चुंबन घेण्यासाठीं वाकलेल्या नायकाला नायिकेचे श्वास धुंद करतात तसे नव्हते,भिंतीच्या सांदीकोपऱ्यांत संसार उभारणाऱ्या ढेकणांना हीटरची आग भाजत सुटते तसे...

—त्याच्या कानशिलांना तापवीत होते. चर्नीरोड स्टेशन येतांच गर्दीच्या लोकगंगेबरोबर वहात वहात रघुनाथ खालीं उतरला, तेव्हां वाऱ्याची गार झुळूक आली. गर्दीतून सरकत सरकत दाराकडे जात असतांना रघुनाथनें स्टेशनच्या भिंतीवर लटकलेले फलक उगीचच न्याहाळले. कुठल्यातरी चित्रपटगृहांत "पॅरीसचा कुबडा" लागला होता.

मागें होमी बाटलीवालाबरोबर पाहिले होते हे कुबडोजीराव...सुन्दर तरुणीच्या प्रणयांत सांपडलेला कुबडा...पराक्रमी कुबडा...लाचार कुबडा...गुदमरून गुदमरून आपण कुबडे झालों तर?...त्याच्याच शेजारीं "क्लीओपात्रा" या चित्रपटाची जाहिरात झळकत होती, ती त्यानें न्याहाळली—

क्लीओपात्राला दोरखंडानं बांधून रोमच्या रस्त्यांतून धिंड काढण्याची प्रतिज्ञा करून निघाली होती सीझर महाराजांची स्वारी; पण इजिप्तच्या राणीचा हिसका कुठें पाहिला होता! महाराणीनेंच शृंगाराच्या राज्यांत सीझरची धिंड काढून फरफटत नेलें...

लाचार सीझर...लाचार कुबडा...

महाराणी क्लीओपात्राच्या बाहुपाशांत लाचार कुबडा...

गर्दीतून बाहेर पडून रघुनाथ रस्त्यावर आला. तीन रस्ते आणि दोन चौक जीव मुठींत धरून त्यानं ओलांडले आणि तो "दैनिक मानवता" कचेरींत येऊनं दाखल झाला. कचेरींतल्या आपल्या टेबलापाशीं येतांच आन्तर्दालनांतून प्रेसमॅनेजर रेवाशंकर बाहेर आला आणि हंसून म्हणाला, "या महाराज! आपल्यालाच फोन करणार होतों आतां इतक्यांत." "कां कांहीं विशेष?" कोट काढून खुर्चीला लावीत रघुनाथनें विचारलें. "साहेब भयंकर तापलेत तुमच्यावर, काल टेस्ट मॅचचा रिपोर्ट पुरा न करतांच पळालांत आपण घरीं."

"साहेबांना तापायला काय होतेंय. काल घरीं जायला मला साडेसात झाले आहे ठावूक?" रघुनाथ तणतणूं लागला – "राक्षसासारखं काम ठेवलंय वाढवून आणि अधिक माणसं नेमायला नकोत"...रघुनाथाचा आवाज चढूं लागला; त्याबरोबर रेवाशंकर खुणावून म्हणतो-- "हळू, हळू. साहेब आहेत आंतमधें." रघुनाथनें जीभ चावली आणि लेखणी सरसावून त्यानें खुर्चीवर ठाण मांडलें. सांचलेल्या तारांचा ढिगारा त्यानं पुढं ओढला. रेवाशंकर म्हणतो– "मॅचचा रिपोर्ट नंतर झाला तरी चालेल. आधीं पंतप्रधानांच्या अमेरिकेंतील दौऱ्याचें वृत्त तयार करून द्या. कंपोझखात्यांतील माणसं खोळंबलीं आहेत. फ्रंट पेज अडून राहिलं आहे तेवढ्यासाठीं."

...अमेरिकेंत नेहरूंचा सत्कार आणि साहेब आम्हांला तापवताहेत इथं ऑफिसांत...

रघुनाथनं एकदा तारेंतल्या मजकुराकडे कपाळाला आंठ्या घालून नजर टाकली. क्षणभर त्याचे डोळे काचेप्रमाणें निस्तेज होऊन शून्यांत शोध घेऊं लागले आणि मग त्याची लेखणी पिवळ्या कागदावर कुरकुरूं लागली.

"...पंतप्रधानांचें अमेरिकेंत बादशाही स्वागत..."

...अंतरांतल्या नाजूक कल्पना, साजूक भाव, चोरट्या इच्छा.

परिस्थितीच्या प्लॅस्टरमध्यें
केव्हांच जाहल्या सुकून पोलाद!
पोलाद जाहले आंतले स्नायू!
पोलाद जाहलें आंतलें मांस!
पोलाद जाहल्या तांबड्या पांढऱ्या रक्ताच्या पेशी.
पोलादी पुरुष!
धांवतो पळतो

पळतो धांवतो !

धापा टाकीत, उद्घाम होत,

टिपें गाळीत, रक्त ओकीत.

कोणत्या मुक्तीच्या दिव्य ध्येयासाठीं ???

—०— —०— —०— —०—

खट्...खडाड्...खट्...खडाड्...खट्...खडाड्...खडाड्...दैनिक मानवता कचेरींत छापखान्याच्या प्रचंड यंत्रागारांत रघुनाथ कच्चीं मुद्रितें हातांत घेऊन उभा होता. रोटरी यंत्राची घरघर शून्य मनानें ऐकत तो मधून मधून मुद्रितें चाळीत होता. समोर टेबलावर नुकत्या आलेल्या तारांचे कपटे भाषांतरासाठीं पडले होते. नजरेसमोर यंत्रें वेगानें फिरत होतीं. आडवे उभे पट्टे भाऊगर्दीनें त्या पोलादी जजाळांत पुढें पुढें घुसत होते. काळेकभिन्न दांडे खट्...खट् करीत आडवे उभें एकमेकांवर आदळत होते. दांतेरीं चक्रें सुसरीप्रमाणें एकमेकांचीं तोंडें कडकडा फोडत स्वत:भोंवतीं भ्रमत होतीं. कोठूनसा कागदाचा सफेद लोळ यंत्रागारांतून सर्पाप्रमाणें नागमोडी वळणें वेटोळीं घालीत येत होता. तपोधन मुनींनें आशीर्वादासाठीं वाकलेल्या शिष्यावर वरदहस्त ठेवावा त्याप्रमाणें तीं प्रचंड यंत्रें आपल्या मुद्रित मजकुरांचे हस्त गुळगुळीत कागदावर ठेवीत होतीं आणि त्याबरोबर खट्कन् आवाज होऊन तयार वर्तमानपत्राची घडी गोमुखींतून पडणाऱ्या धारेप्रमाणें यंत्रमुखांतून बाहेर तक्तपोशीवर पडत होती. एक, दोन, तीन, चार... बधीर झालेल्या संवेदनेनें रघुनाथ अंक मोजत होता. हातांत कच्चीं मुद्रितें तशींच होतीं. नजर सांचत जाणाऱ्या वर्तमानपत्राच्या गठ्ठयाकडे उगीचच रेंगाळली होती.

प्रत्येक पत्रावरील ठळक शीर्षकें आरडून ओरडून सांगत होतीं.

...पंतप्रधानांचें अमेरिकेंत बादशाही स्वागत...

...पंतप्रधानांचें अमेरिकेंत बादशाही स्वागत...

...पंतप्रधानांचें कोंकणांत बादशाही स्वागत...

...रघुनाथराव देसाई यांचें कोकणांत बादशाही स्वागत...

मुंबईः—(आमच्या खास बातमीदाराकडून) नामदार पंतप्रधान रघुनाथराव देसाई आज सायंकाळीं ५–१० च्या गाडीनें सांताक्रुझ विमानतळावरून कोंकणांत जांभळीला आपल्या बायकामुलांना भेटण्यासाठीं उड्डाण करतील त्यावेळीं इतर मंत्री आणि शहरांतील इतर प्रतिष्ठित नागरिक त्यांना निरोप देण्यासाठीं हजर राहाणार आहेत. गेल्या दोन तीन वर्षांत मानवता दैनिकांत तारांचीं भाषांतरें करण्यासाठीं खुर्चीवर बसून त्यांनीं देशाची जी अमोल सेवा केली त्याबद्दल प्रमुख संपादक दे. भ. दादासाहेब दोदवाडकर आणि मालक शेट बिहारीलाल अमृतलाल यांनीं त्यांना......

''संपादक दादासाहेब दोदवाडकर. आहेत

...साहेब तर दिसताहेत ऑफीसमधें. असले खुशींत तर होईल काम, नाहींतर आहेच आगगाडीची झुकझुक! दारावर टक् टक् टक्...

" कोण आहे?"

" मी पंतप्रधान देसाई. "

" या, काय काम आहे ? "

" तीन दिवसांसाठीं मी कोकणांत जांभळीला रजेवर जातों आहें. "

" मग ? तुमची रजा तर मी केव्हांच मंजूर केली आहे. "

" तसं नव्हे पण ..."

" आणखी काय मागणी आहे ? "

" मागणी म्हणजे' ' 'प्रवासासाठीं मला आपलं खास विमान मिळेल तर...''

" विमान ? माझं खास विमान ? तें कशाला ? "

" म्हणजे दोन तासांत पोंचेन मी तेवढीच हुरहुर कमी ! "

" होय अधिकाऱ्यांची कुरकुर कमी होईल खरी. पंतप्रधान आहांत नव्हे काय तुम्ही ? तिथं अगदीं भरगच्च कार्यक्रम असतील तुम्हाला ! घेऊन जा विमान; पण थांबा कोंकणांत विमानतळ आहे काय तुमच्या?"

" न..नाहीं..मला..वाटतं..."

" मग कसे जाणार तुम्ही ? "

मग कसे जाणार तुम्ही ?

कसे म्हणजे ? ५–१० च्या मेलनं.

रघुनाथ भानावर आला आणि त्यानं घड्याळाकडे पाहिलं. तब्बल दोन तास अवकाश होता गाडी सुटायला. आतां काय एवढीं प्रुफं दिलीं कीं आटोपलंच काम. मुलांच्यासाठीं खेळणीं घ्यायचीं, खोलीवर जाऊन बॅग भरावयाची कीं निघायचंच. कीं उद्यां संध्याकाळीं एकदम घरीं... ००० घर...घर...घर...

घर घर, आई—"अरे रघुनाथ, तुला अमसुलाचं पन्हं आवडतं म्हणून मुद्दाम केलयं आज. वाढ, सुनबाई वाढ आणखी थोडं त्याला. एवढंसं खाल्लं नाहींस तर लागलीच पोट कसं रे भरलं ? मला माहित आहे तुझा आहार. ऐकूं नकोस ग तूं त्याचं, वाढ आणखी थोडं... "

घर घर, आण्णा—"ऐकलं का हो, रघुनाथ बाहेर अंगणांत उघड्यावर झोंपलाय, आंगावर पांघरुण नाहीं त्याच्या. गारठा पडलाय, माझी शाल आणतां का तेवढी ? "...

घर घर; इंदुमती—" अगदीं दमून येणं झालंय ना ? खरंच किती मेला हा लांबचा प्रवास ? जरा पडावं आपण. मी पाय चेपतें आपले..."

घर घर, दिनू, नंदा, निमा–" बाबा, मी तुमच्या पुढ्यांत निजणार. बाबा माझे...माझे...बाबा माझे..."

" कुणी कुणाचें नाहीं ! सारे चोर आहेत. "

रघुनाथ दचकून भानावर आला. प्रेस मॅनेजर रेवाशंकर यंत्राच्या प्रचंड कोलाहलांत कुणाला तरी ओरडून सांगत होता.–" पैशाचा प्रश्न आला कीं सगळे एकमेकांचे गळे कापायला तयार होतात.... "

ऑफिसमधली कांहीं तरी भानगड दिसते आहे असं ओळखून रघुनाथानं पुन्हा खुर्चीवर ठाण मांडलें आणि तो पुन्हा मुद्रितें तपासूं लागला.

"...लंडनमध्यें सर स्टॅफोर्ड क्रिप्स यांच्याबरोबर पंतप्रधानांनीं गुप्त मुलाखतींत पाऊण तासपर्यंत स्टर्लींग प्रश्नावर चर्चा केली...."

' स्टर्लींग ' मधील ' स ' उडाला होता. तो दुरुस्त करून रघुनाथनें ती ओळ पुन्हां वाचली....

...स्टर्लींग प्रश्नावर चर्चा केली...स्ट...र्लीं...ग...स्ट...र्लीं...ग

...डार्लींग...डार्लींग प्रश्नावर चर्चा केली...

" डार्लींग, डाऽऽर्लींग ! " मारी डिसूझा किती लाडिकपणें हांक मारते. म्हणूनच बेटे ऑफिसांतले सारे कारकून जळफळतात आणि तो ब्लॉक आर्स्टिट बाटलीवाला म्हणतो कसा डोळे मिचकावून–" या डार्लींगसाहेब ! " पण डार्लींगचा प्रश्न झाला, तरी तो आपल्या खाजगी आयुष्यात. अजून कांही घडलं नाहीं म्हणा तसं आणि घडणारहि नाहीं तसलं कांहीं. छे, भलतंच ! बायकोची आणि तीन मुलांची जबाबदारी आहे आपल्यावर. इतके कांहीं पागल झालों नाहीं आपण आणि होणारहि नाहीं. ही नुसती ओळख, मैत्री म्हणा, किंवा–छे, पण तें नव्हेच.

पण या खाजगी प्रश्नावर पंतप्रधानांना क्रिप्स साहेबाबरोबर गुप्त मुलाखतींत चर्चा करण्याचें काय कारण ?...

"... कारण नाहीं कसें म्हणतां मिस्टर देसाई–विधिमंडळाच्या भर सभेंत उठून पंतप्रधान त्वेषानें म्हणाले–" हा हिंदी संस्कृतीचा प्रश्न आहे, राष्ट्रीय इभ्रतीचा प्रश्न आहे, म्हणून सरकारला त्यांत लक्ष घालावें

लागलें. ” पिंजऱ्यांत उभ्या असलेल्या रघुनाथचे पाय लटपटले. पंतप्रधान आपली तीक्ष्ण नजर रोखून म्हणतात–“ आठ वर्षांपूर्वी तुमचें लग्न झालें आहे आणि सांसारिक दृष्ट्या तुम्ही सुखी आहांत, खरें ना ? तुम्हाला तीन मुलें झालीं आहेत हा पुरावाच आहे त्याचा. तेव्हां बायकोबद्दल तुम्हांला तक्रार करायला जागाच नाहीं. ”

“ मान्य आहे मला, पण...”

“ मग तुमच्यासारख्या सज्जन पापभीरु आणि सात्विक माणसांनीं या मुंबईत जर असा ताळतंत्र सोडला तर...”

“ पण मी कांहीं तसं अजून...”

“ त्या ख्रिश्चन टेलिफोन ऑपरेटर तरुणीबरोबर तुम्ही सध्यां जे चाळे चालविले आहेत ते पाहिले असतां तुम्ही लवकर आपल्या बायकापोरांना निर्वासित करणार असा दाट संशय येतो. ”

“ पण मारीची आणि माझी नुसती मैत्री आहे. ”

“ दोन दिवसांपूर्वीं मारीला घेऊन तुम्ही रीगलमध्यें हॅम्लेट पहावयास गेलां होता, त्यावेळीं अंधारांत तिचा हात हातांत घेऊन कुणी दाबला ? ”

“ तुम्हांला कुणी सांगितला तो प्रकार ? ”

“ मी भारताचा पंतप्रधान आहें, मिस्टर देसाई–”

“ होय, चूक झाली माझी. पण–”

“ असे शरमिंदे होऊं नका. तरुण वय आहे तुमचं, याचवेळीं आमच्या सरकारला तुमच्या नीतिमत्तेबद्दल काळजी घेतली पाहिजे. या वयांत बायकापोरांना असं दूर ठेवून कसं चालेल ? कशी माया लागायची तुमची त्यांना आणि त्यांची तुम्हाला ? ”

“ पण मला घर मिळत नाहीं राहायला त्याला मी काय करूं ? ”

“ तो प्रश्न आमचा नाहीं. आमच्या नागरिकांची नीतिमत्ता सुधारली पाहिजे एवढा आमचा आग्रह आहे. जागा नसेल तर रेंटकंट्रोलरकडे अर्ज टाका—”

" सगळे उपाय करून मी थकलोंय--"

" मग वाटल्यास यू. नो. कडे दाद मागा. देशाचा राज्यकारभार म्हणजे एक प्रचंड यंत्र आहे यंत्र...या यंत्रांत असें कांहीं बळी ..."

कुणीतरी किंचाळलें आणि पंतप्रधान आणि विधिमंडळाची सभा वितळून गेली. मुद्रितें तपासतांना लागलेल्या डुलकींतून रघुनाथ जागा झाला.

"काय झालं ?" टुणकन् उडी मारून भानावर येत रघुनाथ ओरडला. किंचाळत प्रेस मॅनेजर रेवाशंकर धांवला होता आणि कळ दाबून त्यानं यंत्राची घरघर आणि धांवपळ थांबवली होती. रघुनाथ गडबडीनें उठत म्हणाला— "काय झालं, काय झालं ?"

" बघा तर खरं. केवढी मोठी घूस यंत्रांत सांपडून कशी चिरडून निघाली आहे···शी···शी···शी !"

रघुनाथनें पाहिलें. यंत्रांतून रक्ताच्या चिळकांड्या उडून कागदाचें कोरें रीम रक्तबंबाळ झालें होतें. रेवाशंकर यंत्राची पाहणी करीत चुकचुकत म्हणत होता—" सगळं रीम वाया गेलं, कंपोज बिघडला. आतां साहेब बोंब मारणार. मरायला इथं कशाला रांड आली होती कोण जाणे ! " मेलेली घूस पट्ट्याला चिकटून चिरडून सपाट झाली होती. झगझगीत प्रकाशांत तिचे चिरडून लांबोळे झालेले डोळे चकचकत होते.—

...चिरडलेले डोळे···चि··र··ड··ले··ले·· रडलेले डोळे·····र ड ले ले डो ळे·····

इंदुमती रडली म्हणजे तिचे डोळे किती मोहक दिसतात उगीच नाहीं बायकांना मदिराक्षी म्हणत...काम करून डोळे फोडून आपलेहि डोळे कधीं कधीं लालबुंद होतात...पण इंदुमतीचे डोळे मुळांत निळसर आहेत. रडून रडून ते लाल झाले कीं मादक दिसतात इतकेंच...दिनूचेहि डोळे निळे आहेत. गुलामानं आईकडून डोळ्याची ही देणगी छान उपटलीय.

पण इंदुमतीच्या पत्रांत होतं कीं रामोशांच्या शाळेंत जाऊन घाणेरड्या मुलांच्या संगतीनं शिव्या द्यायला शिकलंय हें गुणी बाळ. शिव्या... शि...व्या...भिव्या धायगुडे...भिव्यानं दोन वर्षांचा खंड दिला नाहीं अजून...भाताचा हंगाम संपला म्हणजे मुंबईत येऊन बायकोला रोज-मुऱ्यावर लावून स्वतः गिरणीत काम करतो आणि खंड मागण्यासाठीं आपण खळ्यावर गेलों तर हंसून नुसते वायदे करीत बसतो. दोन वेळेला तंबी देण्यासाठीं आपण शेतावर त्याच्या छपरात गेलों होतों, तर आपण येणार असल्याची कुणकुण लागून स्वारी पसार! आपल्या तोंडाला पुढें बायको उभी. बाई माणसाशी काय वाद घालायचा? बाकी भिवाची बायको-गौरी आहे जरा चवचालच...

तरुण रसरशीत—

बोलण्याचालण्यांत जरा लाघवी, आर्जवी आणि थोडीशी फाजील देखील. आपण उगीचच घाबरलों. एवढं आवर्जून तिनं छपरांत घोंगडी घालून "या धनी-" असं म्हटलं, तर थोडा धनीपणा गाजवायला काय हरकत होती? आपण आपले उभ्या उभ्याच ताठ्यातच "नाहीं" म्हणून प्यायला पाणी मागितलें. पाण्याचा लोटा देतांना तिच्या बोटांना झालेला आपल्या बोटांचा स्पर्श, नजरेला नजर देतांना झालेली चल-बिचल...तेवढ्यानें आपलें रक्त उसळलें आणि सारें दिनूच्या समोर. घाईघाईनें आपण लोटा खाली टाकला आणि खंडाची भाषा न बोलतांच घरीं परतलों. भिवा तो तसा आणि बायको ही अशी! पोरं तसलीच असायचीं आणि ही आपल्या चिरंजिवाना संगत! मग शिव्यागाळीच करायला शिकायचे घरींदारींही.छे, त्याच्या शिकण्याची योजना करायलाच हवी. बाकी हा भिवा आणि त्याची ती गौरी मुंबईत कुठं राहतात ती चौकशी करायला हवी एकदा. तेवढीच गंमत...हो, इथं मुंबईत कोण

कुणाला ओळखणार? आणि मुंबईतली गंमत मुंबईतच. कोंकणांत पुन्हा नामानिराळे. जमल्यास गंमत...नाहींतर खंड आहेच.

खंड नाहीं वसूल झाला तर दिनूला शहरांत शिकायला कसा पाठवावयाचा? तें कांहीं नाहीं! या खेपेला कोंकणांत गेल्यावर शेतावर जाऊन भिवा असो नाहींतर गौरी असो—चांगली खरड काढावयाची. आहे काय त्या बाईत भिण्यासारखं येवढं? बाहुलीसारखी बाई ती!

...बा...हु...ली...बा...हु...ली.

निमासाठीं घेतलेली बाहुली ट्रंकेंत ठेवली ना? बाकी अजून ट्रंक भरायची आहे म्हणा. नंदासाठी बिस्किटाचा पुडा आणि मातीची चित्रं पैदा करतांकरता काल नाकी नव आले आणि दिनूचा मेकॅनो? बाटलीवाला येतांना आठवणीनं घेऊन येतों म्हणाला आहे; पण जर का तो विसरला तर...तर काय? मेकॅनो घेतल्याखेरीज जायचं? आणि दिनूनं चिमणीएवढं तोंड केलं म्हणजे? जरा लांबची चक्कर पडेल खरी, पण... आणखीन् काय सांगितलं होतं बरं इंदुमतीनं? एक बाटली—दारूची नव्हे, दुधाची!

हा बाटलीवाला स्वतः दारु पितो आणि दुसऱ्याला आग्रह करतो. स्वातंत्र्यदिनादिवशीं त्याला वाईट वाटूं नये म्हणून आपण त्याच्या घरीं मेजवानीला गेलों आणि...

बाकी कोण कोण माणसं दारू पितात याचा त्या दिवशी आपल्याला खरा सुगावा लागला. नाहीं म्हणतां ऑफिसमधल्या सर्व माणसांनीं ओठ थोडे थोडे ओले करून घेतले. फक्त आपणच काय तें—आणि आपल्याला काय कमी आग्रह झाला? आडवे पाडून बाटली तोंडांत पालथी करण्याचेंच बाकी राहिलें होतें. आपण म्हणूनच निभावलों. कांहीं म्हटलं तरी संस्काराचा परिणाम कांहीं वेगळाच असतो. ती मंडळी दारूच्या बाटल्या रिकाम्या करीत होती आणि आपण नुसते सोडा पीत राहिलों

होतों. दुसरें करणार काय ? शी ? काय ती चेष्टा, काय ती टवाळी, तो जल्लोश ?...

आजहि तोच प्रकार होणार ! बाटलीवालाचा वाढदिवस ! मग काय, आनंदीआनंद आहे. बरं झालं आपण घरीं निघालों आहे तें, नाहींतर कांहीं घडगत नव्हती आज.

मारी जाणार आहे काय आज तिथं ?

बाटलीवाला म्हणाला नव्हता का—"तुझ्या पोरीनं तुला आज पकडून घेऊन यायला सांगितलं आहे रे मला. बघ बुवा—" छे, उगीच चेष्टा असेल. नाहींतरी बाटलीवाला जरा फाजीलच आहे.मारी दारू पीत असती तर आपल्याला कळलं नसतं काय ? कां ? कळायला काय मार्ग ? ती थोडीच चोवीस तास आपल्याबरोबर असते ? आणि पीत असली तर आपल्याला थोडीच विचारून पिणार आहे ? त्यांच्या समाजाला वरदानच मिळालं आहे तें ! ती आपल्याला आवडत नाहीं म्हणून थोडीच सोडणार आहे ?

आपण कोण तिचे ? ती कोण आपली ?

पत्र लिहिलंच एकादेवेळीं तर शेवटीं कसं झोकांत लिहिते-"तुझीच मारी" छे, तसं लिहिण्याची ती एक पद्धत आहे;पण निव्वळ मैत्रीसाठीं कांहीं कोणी......कांहीं...कोणी काय ?

गेल्या वर्षी आपण मित्रमंडळीबरोबर जुहूला पोहायला गेलों होतों. यथेच्छ जलविहार झाल्यानंतर सपाटून भूक लागली म्हणून तिथेंच मिळणारी मिठाई कुणीतरी आणली. आणि मागचा पुढचा विचार न करतां आपण तिच्यावर सपाटून हात मारला. परत बोर्डींगमध्यें यायला आपल्याला रात्र झाली. परत यायला निघाल्यापासूनच पोटांत ढवळूं लागलं होतं. मध्य रात्रीच्या सुमारास तगमग वाढली आणि जुलाब आणि वांत्या होऊं लागल्या. इतक्या कीं प्राण घाबरा झाला. रात्रीच्या वेळीं

मालक आणि मॅनेजर चडफडून उठले आणि तेहि आपली अवस्था पाहून घाबरून गेले. विषबाधेचा त्यांना देखील संशय आला. घाईनें त्यांनीं डॉक्टरला फोन केला आणि खारला आपली मावस बहिण विमल राहाते तिला आणि तिच्या यजमानांना कळविलें. तर विमल म्हणते कशी–" गाडींत पेट्रोल नाहीं; तेव्हां कसं जमणार यायचं ? थोडी गरम कॉफी घे आणि जरूर वाटली तर डॉक्टरला दाखव. सकाळीं येऊं आम्ही." म्हणे गरम कॉफी घे आणि डॉक्टरला दाखव ! ही नात्याच्या माणसांची माया. नंतर डॉक्टर आले. मालक, मॅनेजर आणि आपल्या खोलींतले, पार्टिजर-सोबती यांनीं घोळ घातला आणि रात्रीं आपण हॉस्पिटलमध्यें जाऊन पडलों. रात्रीच्या सोबतीला गोवानीज राहातों म्हणाला; पण तेवढ्यांत मारी आपला शोध काढीत येऊन उभी राहिली. रात्रीच्या या वेळीं तिला पाहून आपल्याला किती आश्चर्य वाटलें. ओळखीचा आणि आपुलकीचा चेहरा दिसला म्हणून किती हुरूप आला ! मालकांनीं खारला फोन केला तेव्हां मारी ऑपरेटिंग डयूटीवर होती. तिनें सर्व प्रकार ऐकला आणि खास टॅक्सी करून ती रात्रीच इतक्या लांबवर आली आपल्याकडे. रात्र-भर उशाशीं जागं राहून सेवा केली तिनं आपली.

ही माया कुठली ?

म्हणूनच परवा रीगलमध्यें अंधारांत तिनं आपला हात नकळत दाबला असतांना आपण...

छे, पण हा वेडेपणा बंद झाला पाहिजे !

मारी कोण आपली ? आपण कोण तिचे ?...

" अहो महाराज, तुमच्याकडे तुमचं कुणीतरी आलं आहे वर ऑफिसमध्यें-" ऑफिस टेलिफोन कानाला लावून खालीं ठेवीत मिस्कील-पणें रेवाशंकर म्हणाला. रघुनाथ दचकून भानावर आला.–" माझ्याकडे ? आणि माझें कोण येणार यावेळीं ऑफिसमध्यें ? "

रेवाशंकर खदखदला आणि म्हणाला–" तें मला कसं समजणार इथं तळघरांत यंत्राशीं खडबड करीत असतांना? बायको कांहीं खास आली नाहीं तुमची. मग कुणी का असेना ? " आणि त्यानं डोळे मिचकावले.

रघुनाथनं त्याकडे दुर्लक्ष केलें आणि हातांतली प्रुफं संपवून टेबलावर आदळीत म्हटलं–"हं. रेवाशंकर, घ्या, संपलं माझं काम! हीं प्रुफं, हा मजकूर आणि हे तुम्ही. घ्या आणि घाला हवा तो गोंधळ. आतां मी कांहीं मंगळवारपर्यंत येत नाहीं. "

" म्हणजे बाटलीवालाकडे पार्टीला येणार नाहीं तुम्ही ? "

" छे, छे. अहो रजा अवघी तीन दिवसांची. त्यांत पुन्हां असा वेळ मोडायला लागलों तर मग जायलाच नको. "

" नाहीं गेले एकादे वेळेला घरीं ? "

" वा वा. म्हणे नाहीं गेले! अहो सबंध वर्षांतून आज जातोंय मी घरीं !"

" पण मिस् डिसूझा येणार आहे मेजवानीला–"

" असेल, तिचा माझा काय संबंध ? "

" अरे अरे, असं एकदम भडकायला काय झालं ? " रेवाशंकर हंसत बोलत होता. तेवढ्यांत न बोलतां रघुनाथनं टेबलावरची हॅट उचलली आणि तो लिफ्टजवळ जाऊन उभा राहिला.

लिफ्ट खालीं येतांच तो दचकला.

आंत मारी डिसूझा उभी होती; त्यानं दिलेली, त्याला आवडणारी काश्मिरी साडी परिधान करून ! त्याला पाहतांच ती उचंबळून एकदम् ओरडली, " हॅलो डार्लिंग, कसं पकडलं तुम्हाला ? "

त्यानं मंदस्मित करून तिचं स्वागत केलं– थोडंसं रुक्षपणानंच...

आहे काळी घूसच; पण या साडीमधें मारी किती मोहक दिसते. ही साडी इंदुमतीसाठींच घेऊन ठेवली होती आपल्याला बोनस मिळाला तेव्हां; पण अचानक मारीचा वाढदिवस उगवला आणि तिनं आग्रह करून आप-

त्याला घरीं जेवायला बोलावलं. भेटवस्तुशिवाय कांहीं जेवायला जातां येत नाहीं आणि भेटवस्तुसाठीं तर खिशांत कवड्या नव्हत्या. म्हणून हीच साडी...

आतां इंदुमतीसाठीं घेतलेली साडी कांहीं इतकी चांगली नाहीं...पण

मारीसारखी इंदुमतीमधें गम्मतहि नाहीं. मारी कांहीं सुंदर नाहीं पण मोहक...मादक...रीगलमधें तिच्या केसांचा उग्र गंध येतांच आपण अगदीं पागल झालों आणि ..

तशी चूक पुन्हां चुकूनसुद्धां करायची नाहीं असा आपण निश्चय केला.

पण ही बया तर अगदीं हात धुऊन आपल्या शिकारीला लागली आहे; पण ही मारी किती माया करते आपल्यावर. तसं दुसरं कोण माया करणार या मुंबईत? इंदुमती राहिली कोकणांत, चारशें मैल दूर! मुंबईच्या नरकांत मायेची ऊब कोण देणार? इंदुमती राहिली स्वर्गात. रघुनाथ राहिला नरकांत....

स्वर्ग नरकाला भेटेना, राजा राणीला दिसेना....

घर आठवतां मन उचंबळें

नवरसांत जीवन गुंफियलें......

नवरस कसले? इथें बीभत्स रस तेवढा ओगराळ्यानें पोटभर वाढला

जाईल...म्हणूनच एकादी औटघटकेची राणी...

मारी किती रसरशीत आणि मोहक दिसते.तिच्या त्या मांसल दंडाला

अगदीं हळूच स्पर्श करावा काय? भलतेंच? इंदुमतीला काय वाटेल? लग्नानंतर तिला लिहिलेल्या गोड गोड पत्रांतल्या प्रतिज्ञा विसरलांत काय महाराज? पण इंदुमती राहिली कोकणांत! सहाशें मैल दूर, सहा महिने दूर...मुंबईत प्रणयबंदी चाललेली आहे, ठाऊक नाहीं का? सहा सहा महिन्यांतून एकादा ओला दिवस. तोहि बंद होणार आतां. खुद्द स्वतः

राष्ट्राध्यक्ष इथें येऊन प्रणयबंदी जाहीर करणार म्हणतात. मग काय? मुंबई कोरडीच कोरडी...नाहींतर चोरून मारून एकादी मारी!...

रघुनाथ मारीला म्हणाला—" या वेळीं तूं इथं कशी? "

" तुम्ही मला न कळवितां पळून जायचा बेत केला होता नाहीं का?" कृत्रिम कोपानं मारी म्हणाली. रघुनाथ गांगरून म्हणतो–" पळून कां म्हणून? परवांच म्हणालों नव्हतों का मी तुला कीं..."

...काय सांगायचं? परवा कांहींच म्हणालों नव्हतों. सिनेमा चालू झाल्यावर अंधारांत तिचा हातं दाबत आपण म्हणालों होतों, कीं, तुझ्याइतकं या जगांत मला कोणीहि प्रिय नाहीं म्हणून आणि आतां? बायकोच्या आणि मुलांच्या ओढीनं आपण घरीं चाललों आहोंत असं तिला कळलं तर? छे, नकोच तें! त्यापेक्षां असं सांगूया कीं......

" —म्हणालों नव्हतों का मी तुला कीं, माझे वडील आजारी आहेत. त्यांना एकदां भेटून येण्यासाठीं मला गेलं पाहिजे म्हणून? "

मारी एकदम खट्टू झाली. आणि लडिवाळपणें ती म्हणते–" पण आजचा दिवस, फक्त आजचा दिवस माझ्यासाठीं नाहीं का राहतां यायचं तुम्हाला? " तिनं अगदीं कोंकराच्या नजरेनें त्याच्याकडे पाहिलें.

—आजचा दिवस म्हणजे आजची रात्र. नक्कीच, डोळेच सांगताहेत तिचे! आजची रात्र आणि ती मारीच्या खोलींत, तिच्या शय्येवर! वा, किती बहार होईल!

मारीच्या बाहुपाशांत बहार होईल!

गौरीच्या बाहुपाशांत बहार होईल!

आणि इंदुमतीच्या?—

चपापून रघुनाथ म्हणाला–" खुळी आहेस काय तूं मारी? कसला वेडा आग्रह तुझा? "

" नाहीं तुम्हाला राहिलंच पाहिजे. इतक्या दिवसांनंतर आजचा बेत मीं जमवून आणला आहे. " आणि रघुनाथच्या तोंडाजवळ तोंड नेत ती म्हणते-" मी तुम्हांला आवडतें ना ? "

" हें काय विचारणं ? " रघुनाथ उत्तर द्यायचं टाळत म्हणाला. ती पुन्हा म्हणते-" आज माझी म्हातारी आत्या सांताक्रूझला बहिणीकडे गेली आहे आणि माझे चुलतेहि शिकारीला गेले आहेत. घरांत अगदीं तूं आणि मी. बाटलीवालाकडे जेऊं, नंतर मेट्रोला जाऊं आणि मग काय रात्र आपलीच ! "

...मग काय रात्र आपलीच ! वा, नामी संधी ! मारीच्या कोमल हातांचा विळखा,...ते टपोरे मोहक डोळे,...मादक हास्याचे फवारे उडविणारे मिस्किल ओठ,...विलोभनीय लुसलुशीत वक्षस्थळें,...सारें कांहीं आपलेच,...रात्र आपलीच,...मारी आपलीच,...गौरी आपलीच,...मग इंदुमती कुणाची ?

दिनू, नंदा, निमा हे कोणाचे ?...

... मारीच्या घरीं सुशोभित शय्यागृहांत चंद्रकिरणांनीं स्नात झालेल्या मंचकावर आपण मारीच्या बाहुपाशांत पहुडलों आहोंत. चुंबनांचा आणि प्रीतिवचनांचा परस्परांवर वर्षाव चालला आहे...आणि पलीकडे...अगदीं मंचकाशेजारी पलीकडेच बरं का...

जमिनीवर मिणमिणाऱ्या समईच्या मंद प्रकाशांत दिवसाचें कामधाम आटोपून दमलीभागलेली इंदुमती चटईवर पडून आपण येणार असल्याचें पत्र वाचीत आहे. आणि दिनू, नंदा, निमादेखील-

कौतुकानें, थोडेंसें आश्चर्यानें आणि भयानें देखील आपल्याला तशा-बघूं नये त्या स्थितींत टक लावून पाहात आहेत...

रघुनाथ मारीला म्हणतो-" आणि हें काय तुझ्या हातांत आहे ? "

" खरंच तुम्हाला द्यायचं राहिलंच-" मारी पिशवींतून पुडकें काढीत म्हणते. " हा तुमच्या छोकऱ्यासाठीं आणलेला मेकॅनो. "

" तूं आणलास-?" रघुनाथ आश्चर्यानें विचारतो. मारी हंसून म्हणाली,

" कां, मी आणलेला घेणार नाहीं ! बाटलीवाला गडबडींत होता म्हणून मी घेतली ही कामगिरी-" रघुनाथाला आभार कसे मानावेत ते कळेना. त्याला वाटलें, हिचें मन मोडूं नये. राहावेंच आजचा दिवस. हो तर, म्हणे राहावेंच आजचा दिवस ! आणि कोकणांत कोण जाणार ? केव्हां जाणार ? कसे जाणार ?—

मारी पुन्हां अजीजीनं म्हणाली- " मग राहाणार ना ? "

रघुनाथ करारीपणानं म्हणाला- " ते शक्य नाहीं मारी. मला क्षमा कर; पण आज मला गेलंच पाहिजे...." आणि तो तिच्या लाघवी नजरेला नजर न देतांच लिफ्टमध्यें चढला.

"पण रघुनाथ ..." मारी दुखावून लाचारीनें पुढं होत कांहींसें म्हणाली;पण तेवढयांत त्यानें लिफ्टचें दार बंद केलें आणि कळ दाबली. लिफ्ट तळघरांतील यंत्रागारांतून वर वर येऊं लागली. मारीची ती मोहक मुद्रा, ते विलासी विभ्रम, ती केवीलवाणी पण अतृप्त नजर, बुडालेल्या गलबताप्रमाणें तळाशीं राहिली आणि क्षणार्धांत तो उघडया वास्तव भूमीवर आला.पाणबुडी नौका वर येऊन बंदरास लागावी त्याप्रमाणें त्यानं घडयाळांत नजर टाकली. साडे तीन वाजले होते. म्हणजे गाडी सुटायला तब्बल दीड तास अवघी ! आतां काय, बोर्डिंगमध्यें जाऊन बॅग भरायची कीं निघायचं ...

" घर आठवतां मन उचंबळे"—गुणगुणत रघुनाथनं ऑफिसच्याबाहेर पाऊल टाकलं.इतक्यांत ऑफिसमधला एक शिपाई धांवत मागें येऊन म्हणतो. " होमीसाहेबांनीं ही चिठी द्यायला सांगितली आहे आपल्याला. चिठी घेऊन उलगडत रघुनाथ म्हणाला—" आणि होमी कुठं आहे ?"

" आज ते ऑफिसमध्यें येणार नाहींत. चिठी देऊन शिपाई निघून गेला. रघुनाथनं चिठी वाचली आणि त्याच्या कपाळावर आठ्या

उमटल्या. ऑफिसच्या दारांतून आंत जाणाऱ्या शिपायाला त्यानं गडबडीनं हांक मारली आणि म्हटलं—"हें बघ, रात्रीं मी जाणार आहें गांवाला. तेव्हां—बरं जा तूं. मीच सांगेन त्याला काय सांगायचं तें." शिपाई निघून गेला आणि रघुनाथ रस्त्यावर आला.—

शहाणाच दिसतोय हा बाटलीवाला! स्वतःला लेकाला घर नाहीं. राहिला आहे मुंजासारखा ब्रह्मदेशच्या लढाईवरून परतल्यापासून. दिवसभर उडाणटप्पूपणा करावा, रात्रीं मजा मारावी. हें काय जगणं झालं? घरीं जाऊं नको म्हणे…

घर आठवतां मन उचंबळे...

उद्यां संध्याकाळीं आण्णा-माई!

उद्यां संध्याकाळीं दिनू, नंदा, निमा!

उद्यां संध्याकाळीं इंदुमती!...छुत्!—

—o— —o— —o—

बोर्डिंगमधील आपल्या खोलींतल्या खाटेवर बॅग उघडून रघुनाथ प्रवासाची तयारी करण्यांत मग्न झाला होता. खोली रिकामीच होती. आणि खानावळींतले आचारी पाणके दूर स्वयंपाक घरांत टवाळखोरपणानें फिदफिदत होते काउंटरवर मॅनेजरसाहेब हिशेब खरडींत बसले होते. रघुनाथनं बॅगच्या तळाशीं इंदुमतीसाठीं घेतलेली साडी ठेवली, आणि त्यावर निमाची बाहुली, दिनूचा मेकॅनो, आणि नंदाची चित्रं लावलीं. त्यावर धोतर, दाढीचें सामान, परीटघडीचे दोन शर्टस्, दोन लेंगे, आणि..पॅंटस?

पॅंट्स? ...

...धोतर घेतल्यानंतर पॅंट्स काय करायच्या आहेत? जांभळीला खेडयामध्यें आपला थाटमाट बघायला कोण येणार आहे? जाऊन जाऊन जाणार कुठें तर एक बाळं भटजींच्या घरीं... बापू आहे कीं नाहीं तिथं कोण जाणे. या दिवसांत पोराला भिक्षुकी करायला लावणारा बाप अजब आहे खरा! संस्कृत शिकवून मारे पोराला अगदीं शास्त्री केला

आहे. पण दिडक्या मिळवायला आहे का कांहीं उपयोग? बसला आहे बिचारा खेडेगांवांत पुराण सांगत बायाबापड्यांना. बापू असला तर एक त्याला भेटायचं··· आणि दुसरं शेतावर चक्कर टाकायाची. एकादे वेळीं गौरी असली तर···आणि गौरी नसली तरी धोतरापेक्षां पॅंट चढविली म्हणजे कुळाच्यावर छाप चांगली पडते आणि बोलायलाहि कसा जोर चढतो. असू दे एकादी पॅंट.

रघुनाथनें पॅंटची घडी बॅगमध्ये चापूनचोपून बसवली, इतक्यांत कौंटरवर बसलेल्या मॅनेजर साहेबांची—" देसाई तुमचा फोन आहे हो." अशी आरोळी ऐकूं आली. रघुनाथ विस्मयानं हातांतलं काम टाकून उठला आणि कौंटरकडे जाऊं लागला.

—मारीचा नाहींतर बाटलीवाल्याचा. दुसरं कोण फोन करायला बसलं आहे यावेळीं? आपलंच चुकलं. आपण आजवर तिला इतकी सलगी करायची संधी दिली. पागल झालों होतों आपण तेव्हां. आतां बसलेली गांठ आणि गुंतलेले धागे सोडवतांना होतोय जिवाचा आटापिटा. मारीला एकदां स्पष्टच सांगून टाकलं पाहिजे कीं...

" हॅलो, मी देसाई. रघुनाथनं ध्वनिक्षेपक उचलीत म्हटलं—... कुठून?...साहेबांच्या बंगल्यावरून.? ताबडतोब बोलावलं आहे? पण कसं शक्य आहे तें?...होय ना, मी पूना मेलन निघालोंय.. गाडीला तासभर देखील अवधी राहिला नाहीं...पण इतक्यांत तर मी ऑफिसमधून आलों ...साहेबांना माहित नाहीं असं कसं होईल?...बरं.. बरं...बरं...हं, बरं बरं मी असं करतों आतां, कुठं शेटजींच्या बंगल्यावरच आहेत ना साहेब? हं. मी माझं सामान घेतों आणि परस्पर साहेबांना भेटून मग स्टेशनवर जातों म्हणजे झालं. म्हणजे गाडी चुकणार नाहीं माझी. .. होय ना, ही गाडी चुकली, म्हणजे जाणंच आटोपलं आमचं. मग मी जाऊन पोंचणार केव्हां आणि परत निघणार केव्हां,—छे, तें कांहीं शक्य नाहीं...पण असं

व्हायचं नाहीं...साहेब म्हणाले होते मला कीं, मी स्वतः मजकुराची व्यवस्था करीन म्हणून...हं, असेल. कांहीं कळत नाहीं...ठीक आहे, मी निघालोंच इतक्यांत... रघुनाथनं ध्वनिक्षेपक घुश्यानं आपटला आणि तो खोलींत परतला. उरलेलें सामान आवरून गडबडीनं त्यानं कपडे केले. आणि एका हातांत बॅग नि दुसऱ्या हातांत होल्डॉल घेऊन तो बाहेर पडला. मॅनेजर साहेबांना मामुली सूचना देऊन तो जिना उतरून खालीं रस्त्यावर आला. समोरच एक व्हिक्टोरिया खडी होती आणि तिचा मालक शेजारच्या पानपट्टीच्या दुकानांत चकाट्या पिटत बसला होता. रघुनाथ न बोलतां गाडींत बसतांच मुखरसानें रस्ता रंगवीत गाडीवान धांवला आणि ऐटींत लगाम खेचत त्यानें साभिप्राय मागें पाहिलें. रघुनाथनें गाडीवानास पत्ता दिला आणि चौचाकी वेगानं दौडूं लागली. साहेबांच्या चिटणीसाचा त्याला इतका राग आला होता कीं—बाकी राग येऊन करणार काय ! तो बिचारा हुकमाचा ताबेदार.—

...बोर्डिंगच्या मॅनेजरनीं तरी फोन कोणाचा आहे तें आधीं विचारून पाहूं नाहीं? आपणच गाढव! उल्लूपणानें फोन घ्यायला आधीं सांगितला होता कोणी ? आतां साहेबांनीं आपल्या पोतडींतून नवीन कामाचीं पिलं काढलीं, म्हणजे बसा हांका मारीत...पाकिस्तानशीं युद्ध तर पुकारलें नाहीं ना सरकारनें. छे, आपले नेहरू आहेत मंत्रीमंडळांत, तोंपर्यंत तर कांहीं शक्य नाहीं...मग ! कोणाचा खून, कोणाचा मृत्यू ! छे, तसें असतें तर जाहीर रडारड आणि निवेदन यांचा जल्लोष उसळला नसता का ! टेस्ट मॅच तर लांबली नसेल ! ब्रेबोर्न स्टेडियमवर आजहि कोणी पराक्रम केला असला म्हणजे निकाल लागला आमच्या रजेचा...म्हणजे याहि खेपेची घरीं जायची संधी बारगळायची. मग बसा शंख करीत आढ्याकडे पाहून दिवस उगाळीत...

इंदुमती वाट पाहील, मुलं वाट पाहतील, आण्णा–माई वाट पाहतील. ..., आणि रघुनाथराव बसले आहेत आळ्यांवर दिवस उगाळीत!...

व्हिक्टोरिया शेटजींच्या बंगल्यासमोर येऊन उभी राहिली. त्यानं घड्याळांत पाहिलं. अजून अर्धा तास अवकाश होता. जलदी केली तर गाडी कांहीं बहुशः चुकायची नाहीं. त्यानं आपल सामान व्हिक्टोरियांतच ठेवलें आणि गाडीवानास मामुली सूचना देऊन तो जवळ जवळ धांवतच बंगल्यांत शिरला. व्हरांडा ओलांडून तो आंत घुसला तोंच एक चपराशी दारांत उभा होता,तो सूचना न देतां आंत घुसणाऱ्या या अजब माणसाकडे पाहून एकदम खेकसला–" कुठं चाललात रावसाहेब ? "

" साहेबानीं बोलावलंय मला ! दादासाहेब इथंच आहेत ना ? "

" नांवाचं कार्ड द्या लिहून, आणि बसा इथं. जाऊन वर्दी देतों मी. शेटजींच्याबरोबर चहा चालला आहे साहेबांचा. बडे पाहुणे आले आहेत एक. " चपराशी त्रासिकपणें गुरगुरला.

" पण मला गाडीनं जायचंय... " अधिरेपणानं रघुनाथ काऊन ओरडला. पण लागलीच त्यानं, पुढं केलेल्या चिटोऱ्यावर स्वतःचं नांव खरडून दिलं. चपराशी अगदीं शांत पावलानं आंत कुठेंतरी निघून गेला. रघुनाथ अधीर झाला, अस्वस्थ झाला. टेबलावर उद्याचा " मानवता " पडलेला होता. तिकडे त्याचें लक्ष गेलें. "पंतप्रधानांचें अमेरिकेंत बादशाही स्वागत..." उगीचच उसळून त्यानं वर्तमानपत्र उचलून पालथें आपटलें. तो ऑफिसमध्यें असता तर तें भिरकावूनच दिलें असतें.

घड्याळाचा कांटा कसा शाळेंतून सुटलेल्या मुलांप्रमाणें धांवत होता. रघुनाथ उगीचच चरफडला आणि चिडला. अस्वस्थपणानें तो दालनांतून बाहेर आला, आणि व्हरांड्यांत भव्य जिन्याखालीं येऊन उभा राहिला. शीळ घालीत शून्य मनानं तो समोर पाहूं लागला–

समोरच्या इमारतीच्या गच्चीवरून दोन अर्ध्या चड्डींतलीं पोरें आकाशांतले पतंग खेचीत होतीं आणि जमलेलीं चिल्लारपिल्लारें गिल्ला करीत होतीं. पलीकडे कुठेंतरी रेडिओ लागलेला होता आणि कुणीतरी गवई बागेश्रीच्या ख्याल–अस्ताई ढंगदारपणें आळवीत होता. समोरच्या रस्त्यावरून एक आंधळा भिकारी काठी टेकत टेकत शांतपणें रस्ता ओलांडीत होता. पलीकडे फूटपाथवर बसून दोन पुरभय्ये चिलीम भरीत बातचित् करीत होते. सारें कसें शांतपणें, संथपणें, आणि स्वस्थपणें चाललें होतें.

बुदुक्...बुदुक्...बुदुक!...

रघुनाथच्या खांद्यावर आणि डोक्यावर वरून कोठूनतरी गवताच्या काड्या, कापसाचे बोळे आणि थोडासा कचरा टपकला.

बुदुक्...बुदुक्...बुदुक्!...

तेवढ्यानें रघुनाथचें पित्त उसळलें आणि अंग झटकीत तो दूर झाला. त्यानं वरती उपड्या जिन्याच्या पोटात नजर टाकली.

चिव..चिव..चिव.. एक चिमणी आपल्या पिटुकल्या घरट्यांतून भुर-कन् उडाली आणि जमिनीवरील कुठलासा दाणा टिपून पुन्हा भुरकन् घरट्यांत दडाली. गवताच्या काड्या, फाटक्या चिंध्या नि कापसाचे बोळे एवढया कच्च्या मालावर जिन्याच्या पोटांत चिऊताईनीं किती पण छान इमला उठवला होता. एक इवलाले पिल्लूं चिवचिवाट करीत घरट्यांतून डोकावत होतें. आणि ते दोन छोटे पांढरे गोलक, उद्यां जन्माला येणाऱ्या पिल्लांची मऊ माया होती ती !

दोन तीन जीव कसे मजेंत बसले होते.

रेंटकंट्रोलरकडे अर्ज नाहीं कीं घरमालकाला पागडी नाहीं, आणि साहेब बसलेत हांका मारीत, खानावळींतल्या खाटेवर मावळणारा दिवस मापीत. बुदुक्...बुदुक् !... पुन्हा कचरा टपकला.

दूरच्या पिंपळावर कावळा ओरडला—काऽव...काऽव !...

काऽव...काऽव ..चिव्...चिव्...चिव् !
चिव् चिव् चिव्...काऽव...काऽव !...
आठ वर्षांचा रघुनाथ काऽव...काऽव !

शाळेला बुटी मारून, उंबराच्या झाडाखालीं काऽव...काऽव?
उंबरं चघळीत, वेडावून दाखवीत काऽव...काऽव !
" कावळेबुवा कावळेबुवा काऽव काऽव !
" चिऊताई, चिऊताई दार उघड— "
" कोण रे तूं ? "
" मी कोण ? मी कॅप्टन कावळा. "
" काय रे पाहिजे तुला ?"
" मला हवीय जागा, मला हवंय घर..."
" जागा पाहिजे तर काटक्या जमव, चिंध्या जमव, कापूस जमव, कचरा जमव..."

" आहेत कुठं काटक्या ? आहेत कुठं चिंध्या ?
कापूस-कचरा काळ्या बाजारांत !
चिऊताई, चिऊताई दार उघड.... "
" माझ्या घरांत इवलींशीं पिलें, इवलेंसें अंडें-तुला ठेवूं कुठं ?"
" पिलें दे फेकून, टाक अंडें फोडून, आणि घे मला दाऽर उघडून. "
" जळळं मेल्या तुझं तोंड, जा कर काळं तोंड !..."
" मी आहें कॅप्टन, मी आहें साहेब,
माझ्या आहेत " ओळखी ", माझे आहेत वशीले...
सरकारांत जाईन,
चार आमदार जमवीन, आरडा ओरड करीन-
कीं-चिऊताईनीं चिऊताईनीं पागडी दिली, पागडी दिली,
देवाला पागडी देऊन जागा घेतली... "

" असं रे काय करतोस दादा ?..."
" सरकारांत जाईन,
चार शिपाई आणीन,
दार तुझें फोडीन, पिलें फेकीन, अंडें फोडीन,
तुझा तमाऽशा पाहीन !...
काऽव...काऽव...काऽव काऽव !...
चार कावळे जमले.
खलबत कुटलें; आरोप लादले—
" चिऊताईनीं चिऊताईनीं पागडी दिली, पागडी दिली;
देवाला पागडी देऊन जागा घेतली... "
चिऊताईचें दार फुटलें, अंडीं फुटलीं, पिलं फेकलीं
जमती जम्मत गम्मत झाली !
फुटक्या अंड्यांचीं टरफलं चेचीत छोटा रघुनाथ थय् थय्
नाचूं लागला.

फुटक्या अंड्यांचीं टरफलं चेचीत छोटा रघुनाथ थय थय नाचूं लागला. भविष्यकाळांतला मोठा रघुनाथ भूतकाळांतल्या छोट्या रघुनाथाला दरडावतो...—" काय केलंस हें कारट्या ! कुठं पाप फेडशील ! घरटं मोडलंस, अंडीं फोडलींस, पिलं फेकलींस—चिमणीला देशोधडीला लावलंस ! थांबा आतां—चिमणी देईल शाप, कीं देवा, रघुनाथचं घर मोडून टाक..."

रघुनाथचं घर मोडून टाक...चिमणीचा शाप, चिमणीचा शाप !

रघुनाथ मराठी शाळेंतून इंग्रजी शाळेंत गेला, तेव्हां त्यानं पहिल्यांदा आपलं गांव आणि जांभळीचा राहाता वाडा सोडला. आणि हायस्कूलमध्यें जाण्यासाठीं पुण्याला चुलत्याच्याकडे गेला. प्रशस्त वाड्यांतून अंधेऱ्या चाळींत...

रघुनाथचं घर मोडून टाक...चिमणीचा शाप, चिमणीचा शाप !

हायस्कूलांतून शेवटची परीक्षा पास होऊन रघुनाथ गेला कॉलेजमध्यें.

चुलते वारले तेव्हां अंधारी चाळ सुटली. आणि वसतिगृहांतली खोली चिकटली...

रघुनाथचं घर मोडून टाक...चिमणीचा शाप, चिमणीचा शाप !

गांधीजींची चळवळ उगवली. " भारत छोडो, चले जाऽव "

रघुनाथरावांनीं कॉलेजवर लाथ मारली आणि घोषणा केली. पत्रकं वाटलीं. भूमिगत होऊन सूत्रं हलवलीं. आणि एक दिवस स्वारी पोलीसांना सांपडली. भाड्याच्या घरांतून बिनभाड्याच्या खोलींत...

रघुनाथचं घर मोडून टाक...चिमणीचा शाप, चिमणीचा शाप !

बिनभाड्याच्या घरांतून रेशन कचेरींत...

रेशन कचेरींतून कोर्टकचेरींत...

कोर्टकचेरींतून गोंडा घोळीत, वशिले लावीत, थुंकी झेलीत...

वर्तमानपत्राच्या मोठ्या कचेरींत...

खानावळीच्या खोलींत अर्ध्या खाटेवर...

रघुनाथचं घर मोडून टाक, चिमणीचा शाप, चिमणीचा शाप !

फरशीवर पावलांचा आवाज ऐकून रघुनाथ दचकून भानावर आला.

आणि तो अदबीनं सावरून उभा राहिला. साहेबबहादूर खादीच्या रुमालानं तोंड पुशीत घाईतच प्रवेशले. साहेबांनीं रघुनाथला पाहतांच प्रश्नार्थक मुद्रा करून म्हटलें. " येस मिस्टर देसाई ? व्हॉट कॅन आय डू फॉर यू ? "

" आपण तांतडीनें बोलाविल्यावरून आलों मी...."

" कोणी मीं ? नॉन्सेन्स. मीं कधीं बोलावलं तुम्हांला ? "

" आपल्या खाजगी चिटणीसांचा फोन आला होता मला इतक्यांत."

" ओ माय गॉड, व्हॉट अ ऽ ब्लडी फूल !...त्यानं तुम्हांला बोलावलं? "

" म्हणजे ? मीं नाहीं समजलों ? "

" मी कॅशियर सरदेसाईंना पाठवून दे म्हणून सांगितलं त्याला, तर त्यानं...आय ॲम सो सॉरी ! "

" गाडीनें निघालों होतों मी आतां..."

" आतांच्या गाडीनं ? देन् बी क्विक्. अजून..."

" अजून वीस मिनीटं आहेत सांपडेल सुद्धां गाडी मला घाई केली तर. "

" गो अहेड यंग मॅन-मग थांबलांत कां ? ... "

" पण चुकली तर एकादा दिवस रजा वाढवून .. "

" ओ, नो नो ! दॅट कान्ट बी डन् ! दॅट इज नो अेक्स्क्यूज फॉर दि ऑफिस ! देशाचं काम आहे हें. वर्तमानपत्र म्हणजे कांहीं कुणाचा खाजगी कारभार नाहीं. मंगळवारीं तुम्हाला परतलंच पाहिजे. अच्छा जयहिंद ! "

साहेबांनीं पाठ फिरवली. रघुनाथ जीव मुठींत धरून पळत बाहेर आला आणि व्हिक्टोरियांत उडी मारत तो ओरडला " चलो बोरी-बंदर " व्हिक्टोरिया स्टेशनच्या आवारांत शिरली तेव्हां ५-३ झाले होते. अजून सात मिनिटांचा अवधी होता. गडबडीनें गाडीवानाचे पैसे चुकते करून रघुनाथानं एका हातांत ट्रंक घेतली आणि दुसऱ्या हातांत वळकटी घेऊन तो प्रवेशद्वाराकडे पळत सुटला.

तेवढ्यांत गाडीची कर्णकटु शीट कानावर आली आणि त्याच्या जिवाचें पाणी पाणी झालें. घामानें शरीर डबडबलें, धाप लागली, घशाला कोरड पडली. प्रवेशद्वारापाशीं तो अशा स्थितींत येऊन पोंचला तेव्हां गाडी डौलांत शांतपणें प्लॅटफॉर्मची हद्द ओलांडून गेली होती. हातांतली बॅग आणि होल्डॉल खाली आदळून चेकर उभे होते त्यांच्यावर रघुनाथ खेकसला- " याचा अर्थ काय ? अजून पांच पांच देखील झाले नाहींत माझ्या घड्याळांत आणि गाडी इतक्यांत गेली कशी ? "

चेकर खदखदले. एक म्हणाला " समोरच्या रेल्वेच्या घड्याळांत पाहा एकदां महाराज. पांच मिनिटं उशीरा सुटलीय आज गाडी. " आणि दुसरा चेकर खदखदून म्हणतो - " आणि घड्याळाला एकदा डॉक्टर दाखवा आपल्या. "

रघुनाथाला ब्रम्हांड आठवलें. डोकें सुन्न झालें. डोळे भरून आले, आणि त्यानं प्लॅटफॉर्मकडे पाठ फिरवली.

—o— —o— —o—

फोन संपवून केबिन्‌मधून निराश मनानं रघुनाथ बाहेर आला. आणि जड पावलांनीं लोकलच्या प्लॅटफॉर्मवर येऊन उभ्या असलेल्या रिकाम्या गाडींत तिसऱ्या वर्गाच्या डब्यांत एका कोपऱ्याला तो बसला—...

...नो नो रजा वाढावितां येणार नाहीं. तुम्ही जात नसलां तर उद्यांच कामावर रुजू व्हा...

...पण साहेब, गेल्या जवळ जवळ वर्षांत मी घरीं गेलेलों नाहीं. प्रत्येकवेळीं कांहीं तरी...

"...मी तरी कुठं महाबळेश्वरला गेलोंय ? देशाचं काम आहे हें मिस्टर देसाई..."

...म्हणे, मी तरी कुठं महाबळेश्वरला गेलोंय ? आणि मालकाची थुंकी झेलून पगारवाढ कुणी करून घेतली ? आणि शेटजींच्या मुलाबरोबर वाशिला लावून अमेरिकेची वारी कुणी केली ? चोर, बदमाष—...

" रामराम रावसाब. " रघुनाथनं दाराकडे दचकून पाहिलं. गिरणी-कामगारांचा एक घोळका आंत शिरत होता. त्यांपैकीं एक कामगार रघुनाथला पाहतांच...—

—.. अरे हा तर पिऱ्या धायगुडे ! भिवाचा भाऊ...—

" कोण पिऱ्या ? तूं रे इथं कसा ? "

पिऱ्या आपल्या कंपूसह रघुनाथ बसला होता तिथें थेट घुसला आणि अगदीं त्याला खेटूनच ठाण मांडीत तो म्हणतो—" जसं तुमी तसंच

आमीबी ! पोटासाठीं कुटंबी चार पाट्या टाकायच्या. खरंकी नाई रं गड्यांनो ? " समोर बसलेले चंचीबहाद्दर शेमलेवाले आणि पटकेवाले खदखदले...–

–...हा पिऱ्या तर थेट आपल्या आंगाला आंग भिडवून बसला कीं !

कोंकणांत घरीं येतो तेव्हां कसा अदबीनं, पायरीवर नाहींतर आंगणांत... बाकी त्यानंहि तिसऱ्या वर्गाचा पास काढला असेल. कां नाहीं बसणार तो खेटून ? आपल्याला लाज होतीं तर आपण काढायचं होतं पहिल्या वर्गाचं तिकीट. पहिल्या वर्गाचं तिकीट ! हो–म्हणायला काय जातंय ? पगाराची तोंड मिळवणी करतांना मग येतात नाकीं नव ...मग हवा कशाला हा फुकटचा धनीपणा ! बाकी या लोकाना रीत-भातच नाहीं. ऑफिसमध्यें साहेबांनीं " बसा " म्हटलं तरी आपण त्यांच्यासमोर खुर्चीवर बसत नाहीं. कांहीं म्हटलं तरी शिक्षणाचं कल्चर वेगळंच असतं...

" भिवा कुठं आहे रे ? जांभळीलाच का ?" रघुनाथनं विचारलं.

" त्ये कशा पायीं ? त्योबी आलाय इतंच गिरणगांवांत. हाय काय ततं ? वलं कोरडं गवत ? "

" इथं आलाय भिवा ? गिरणींत कामासाठीं ? "

--... अरे म्हणजे या खेपेचा खंड तरी वसूल झाला आहे, कीं नाहीं ! का आण्णांच्या हातावर तुरी देऊन आलाय हा इसम ? ...

" भाताचा हंगाम संपला वाटतं ? "

" कवाच. हंगाम कसचा ? उगाच कुटं चार लोंब्या जमीनींतन डोकावल्या त्याबी सरकारानं आन् थोरल्या रावसाबानं कावकाव करुन-शान घेतल्या. मग कुळानं खावी काय म्हाती ? "

" भिवानं यंदाचा तरी खंड दिलाय कीं नाहीं ? "

"त्ये काय ठाव नाय बा. इच्यारा की त्येस्नीच. येताय गिरणगांवांत ?

चला तरी त्या गरिबाच्या छपरांत. तेवढीच पायधूळ लागल..."

"'माजोरी झाले आहेत कामकरी. कांहीं झालं तरी, आय एम ए मॅन ऑफ पोझिशन्... आज ना उद्यां उपसंपादक..., उद्यां ना परवां सह-संपादक.. परवा ना तेरवा मुख्य संपादक... बसायला मोटर ... हात जोडून पुढें नोकर...

पण आज ? ... बसा तारांचीं भाषांतरं करीत नि प्रुफं तपाशीत. पिऱ्या म्हणतो-- " वाइच च्यापानी करा आन खंडाचं बी इचारून पगा... "-

"'तें कांहीं नाहीं. खंड वसूल झालाच पाहिजे. खंड वसूल झाला नाहींतर दिनूला शहरांत शिकायला कसा पाठवायचा ?...

" लई इचार करतायसा ? चला की राव, गौरीआक्का बी हाय हतं. "

... —गौरी आलीय इथं ? मग गेलंच पाहिजे... तेवढीच गंमत... गम्मत नाहींतर खंड... ग... म्म... त.... नाहींतर खंड आहेच ..."

" ठीक आहे येतों मी. पण चहा वगैरे कांहीं घेणार नाहीं हं मी. मला एकदा भिवाला चांगला झाडायचाच आहे..." रघुनाथ घुश्शांत गुरगुरला. हो ऽ ऽ हो ऽ ऽ हो करून समोरच्या बाकावर बसलेले पिऱ्याचे दोस्त सातमजली हंसले. रघुनाथाला अकारण शरमल्या-सारखें झालें.

...—त्यांत हसण्यासारखें काय आहे ? ... आमचे साहेब नाहीं आम्हांला झाडीत ? चांगली खरमरीत खरडपट्टी काढतात.... तसेंच आम्हीं भिवाला ... पण आपल्या बोलण्याचें दिसत नाहीं हें हंसू. तो कोपऱ्यांतला कामगार सांगतो आहे कांहींतरी .... त्याच्या बोलण्यावर मंडळी फिदफिदलेली दिसताहेत .....

"... असा पिटला, असा पिटला, असा पिटला कीं इचारू नगं. म्हनलं बाईमानसाशीं लई गमजा चालल्या व्हत्या तुझ्या नवं?" ...
"अरं तसं कशा पायीं ? गौरी अक्कानंनी पायताणच काढलं त्येच्यावर आन् च्यार मानसांत सोबा केली त्येची....–"
....–कोणाची शोभा ? कोणाला पिटला ? आपल्याला ? आपण बाई माणसाशीं काय गमजा केल्या ? कधीं केल्या ? ....नुसत्या उगीच बोटाला स्पर्श....तोहि पाणी देतांना अगदीं सहजगत्या....ही गौरी तरी बरीच ढालगज दिसते आहे कीं !—...
पिऱ्या हंसून म्हणतो–" आमच्या गिरणींतल्या मॅणेजरचें हाय ये. माजला व्हता लेकाचा लई दिसापून...."
...–मॅनेजरचेंच ना ! मग कांहीं हरकत नाहीं. खुशाल पिटा लेकाला. पण मारायचं म्हणजे काय एकंदरींत रानटीपणाच....
" चला रावसाब उठा परळ आलं. आना इकडं. म्या तुमचं सामान घेतू." गाडी थांबतांच पिऱ्यानं रघुनाथाची बॅग आणि त्याचा होल्डॉल उचलला. तेवढ्यानें रघुनाथराव खूष झाले आणि पिऱ्या आणि त्याचे दोस्त यांच्या पाठोपाठ तो धक्काबुक्की करीत खालीं उतरला. पिऱ्या आणि त्याचे दोस्त पुढें अचकट विचकट गप्पा मारीत हमरस्त्यावरून चालले होते. आणि पाठोपाठ रघुनाथहि. दोन पावलें जरा मागूनच... खेड्यांतल्या अस्पृश्यासारखी दीनवाणी मुद्रा करून.

हमरस्ता सोडून कामगार–चाळींतील विभागांत वळतांच पिऱ्याचे दोस्त पांगले. पिऱ्याच्या पाठोपाठ रघुनाथहि एका अरुंद घाणेरड्या गल्लींत वळला कपाळाला आंठ्या घालून आणि नाकाला रुमाल लावून. एका जुनाट ओंगळलेल्या चाळीसमोर बाहेरच भिवा पांचदहा कामगारांच्याबरोबर तावातावानें बोलत असलेला रघुनाथाला दिसला. त्याला वाटलें-आपल्याला पाहतांच भिवा चपापेल, शरमिंदा होईल,-निदान

अदबीनं स्वागत करण्यासाठीं लगबगीनं धांवून तरी येईल. पण तसें कांहींच घडलें नाहीं. निर्लज्जपणें हंसून भिवा म्हणतो. " या धनी इकडं कुठं वाट चुकला ! "

पिऱ्या मिस्कीलपणें हंसून म्हणतो- " वाट चुकली नवं, बरावर गावली. खंडाच पैसं मागाया आल्याती धनी. "

" असं वय ? वाइच् बसा तर खरं आं मंदी. या बाप्यांना जरा बाटेला लावतू आनू बोलतू तुमासंगं....ए कारबारनी, अग लोळती-यास काय ! पग तर खरं कोन आलं बाहीर..."

" कोन मालक आल्याती जनू ? ओ भावोजी, कांबुरनं झटकून टाका बरं. " आंतून आलेला गौरीचा आवाज ऐकतांच रघुनाथ गडबडीनं दारासमोरच्या मार्गावर पोंगाऱ्याच्या माशा ओलांडून आंधाऱ्या खोलींत शिरला. आणि चपापला...

...—नजरेला तिरपी नजर नाही... ओठांची चलबिचल नाहीं... पदराची चाळवाचाळव नाहीं...

आंधाऱ्या खोलींत एक चिमणी धुरकट ज्योत ओकीत होती. बाजेवर तान्हुल्याला पदराआड घेऊन गौरी बसली होती. तिनं धीटपणानं नजरेला नजर दिली आणि ती प्रसन्नपणें हंसली. रघुनाथला एकदम स्वतःची लाज वाटून तो दारांतून बाहेर पाहूं लागला....अशीच लाज, अशीच शरम, ... पूर्वीं एकदां...

...—श्रृंगाराच्या जिभल्या चाटीत दिनूच्या जन्मानंतर आपण कोंकणांत घरीं गेलों आणि इंदुमतीला बाहुपाशांत कवटाळण्यासाठीं माजघरांत बाळंतिणीच्या खोलींत घुसलों. आणि—

बाळंतपणांतून उठल्यानें फटफटीत पडलेली आणि कृश झालेली इंदुमती पाहून आपण चरकलों. इंदुमती मुलाला पाजीत बसली होती. आणि तिचे डोळे....

श्रृंगाराची मादक मदिरा कापूर जळावा तशी तिच्या डोळ्यांतून भुरभुर जळून गेली होती. वात्सल्याचे आणि कारुण्याचे नद दुथडी भरून वाहात होते. नजरेला नजर मिळाली, आणि—

पहिल्या धुलईत फॅन्सी रंगीत कापडाचा रंग विटून ओघळावा तसा आपल्या डोळ्यांतला श्रृंगार पार धूवून गेला. आपली जीभ लुळी पडली. आंगांतलें त्राण लाचारीनें हरपलें...

" हुभं किती येळ न्हाणार धनी ? टेका वाईच जरा. " गौरी हंसून म्हणाली. रघुनाथ कांबळ्यावर न बसतां समोरच एक मोडकें खोकें होतें त्या खोक्यावर–...

...–आपल्याला हवी होती ती गौरी नव्हे...ही...ही...एक पोक्त बाई... आणि आतां आई...

चेहऱ्यावरची मस्ती वितळली...उन्माद ओसरला...यौवनाचा मोहर झडला...आणि...आणि...

हे नाजुक प्रसन्न भाव कोठून चिकटले ? मुद्रेवर ही करारी निष्पापता कोणी रंगविली ? डोळ्यांतून श्रृंगाराचे हौद उपसून कारुण्याचे,वात्सल्याचे सागर कोणी भरले ?

पदराआडच्या ममतेंत घडीभर डुंबलेल्या इवल्या तान्हुल्यानें ?

अशीच इंदुमती बदलली होती आणि आपण ?

हे छोटे पक्षी घरांत उतरले म्हणजे बायकांच्यांतली गंमत खलास होते. त्यापेक्षां कसे मजेंत एकटे राजा--राणी.

मग कुठला रघुनाथ आणि कुठली इंदुमती ?

कुठला दिनू आणि कुठली निमा ?

एकटा आदाम आणि एकटी ईव्ह...

त्या खोक्यावर बसला आणि मामुली बोलूं लागला. त्याचें लक्ष गौरी वरून उडून बाहेर तावातावानें बोलत होता त्याच्या शब्दाकडे लागलें.

भिवा म्हणत होता साऱ्या कामगारांनीं एक दिलानें मोर्चा नेला पाहिजे. कापूस मिळत नाहीं ही या नफाराक्षसांची लुच्चेपणाची सबब आहे.

...—हा भिवा बराच बोलायला लागला कीं ? या अडाणी शेतकऱ्याला हें शहाणपण शिकविलें कोणीं ? कोंकणांत असतांना कसा गोगलगाई-सारखा वागत होता. मालकाला मारण्याची भाषा ? मालकापुढें गोंडा घोळायचा कीं त्याला मारायला निघायचें ! आणि मारल्यानें नोकरींत बढती होईल थोडीच ? फार तर फौजदारी फिर्याद...गिरणी बंद होणार असेल तर मोर्चा नेऊन काय होणार ? एक गिरणी बंद पडली तर दुसरी... एक नोकरी गेली तर दुसरी...वशिला लावून...गोंडा घोळून...थुंकं झेलून···

भिवा म्हणत होता, मालकाला भ्यायला कशाला हवें ? तो काय वाघ आहे की राक्षस, म्हणून खाणार आहे आपल्याला ? आणि खाऊन आतां काय खायचं राहिलंय ? आपलं पोट आपल्या हातावर—तेंहि उपाशी. फार काय गोळीबार करतील ना ! करूं देत. गोळ्या घेऊं छाती-वर आणि मरूं...

...—बराच शूर दिसतोय हा ! मरायची भाषा देखील सहज बोलायला शिकलाय हा भिवा. कॉलेजमधें असतांना बेचाळीसच्या चळवळींत अशींच छातीवर गोळ्या झेलण्याची आणि मारण्याची भाषा बोलून आपण टाळ्या मिळविल्या होत्यां. प्रत्यक्ष प्रसंग आला होता तेव्हां पळापळ झाली होती म्हणा. पण प्रत्यक्ष खरा कोण मरतो आणि गोळ्या झेलतो ? ती आपली एक बोलायची भाषा असते इतकेंच. पण त्यावेळीं तुरुंगांत जाऊन कांहीं कमी हाल भोगले नाहींत.

पण तें स्वातंत्र्यासाठीं—! टीचभर पोटासाठीं नव्हे.—

आतां स्वातंत्र्य मिळालें. आणि पोट ?

मुंबईंत पोटभरायला काय कमी ? खानावळींतले काटेकुटे आहेतच.

आणि घर ? ....

कामगार मंडळींना वाटेला लावून भिवा आंत आला. रघुनाथ तण-तणून खंडाबद्दल दमबाजी करूं लागला. भिवा शांतपणें पीक पाण्याची स्थिती सांगूं लागला. सरकारनें धान्यवसुलीसाठीं आपला कसा छळ केला, थोरल्या रावसाहेबांनीं म्हणजे आण्णासाहेबांनीं निम्मे अधिक पीक कसें लाटलें हें सारें त्यानें सांगितलें. आणि मग तो म्हणतो—
" आतां सांगा दादा, आमच्या प्वाटालाच जर दोन घांस निघाले न्हाई तर कुठून खंड द्यावा तुमास्नी ? अवं पीकपाणी रग्गड येतं तर आमाला काय हौस हाय वंय हतं म्हमईला नांदायची ? अन् आपुन बी आपल्या मनाला इचारा की—थोरल्या रावसाबाच्या काळांत येत व्हतं तसं पीक-पाणी असतं तर आपुन तरी कशापै आला असतां व्हं हतं आंगण परदेशी करून ? "

" तो शहाणपणा तूं मला शिकवूं नकोस. पीकपाण्याच्या गोष्टी मलाहि समजतात. चोरून धान्य विकणारे हरामखोर लोक आहांत तुम्ही. तें कांहीं नाहीं. आठ दिवसाच्या आंत खंडाचे पैसे तूं उभे केले नाहींस तर माझ्याशीं गांठ आहे. याद राख..." तणतणत रघुनाथ बाहेर पडला. पाठोपाठ त्याची बॅग आणि होल्डॉल घेऊन पिऱ्याहि निघाला. गल्ली ओलांडून रघुनाथनें स्टेशनचा रस्ता धरला. चिडचिड करीत त्याचें मन आंतून जोरानें उसळलें.

जरा कडकच झाला हा डोस. पण करणार काय ? खंड वसूल झाला नाहीं तर दिनूला शिकायला शहरांत पाठवायचा कसा ? नाहीं दिले पैसे तर काय करणार आहोंत आपण?मारवाड्यासारखी गाडगीं मडकीं लिलावाला थोडींच काढता येणार आहेत आपल्याला ? चोराला माहित आहे हें, म्हणूनच असा गैरफायदा घेतो आहे. नेहमींचीच जिकीर आहे ही. तरी

च्पन वेळां आण्णांना सांगून पाहिलं कीं आतां दिवस बदललेत. पूर्वी सारखी मिजास चालायची नाहीं. जमिनीला भाव येतोय तेवढ्यांत ती विकून टाका. पण त्यांच्या आपल्या संस्कृतीच्या आणि खानदानीच्या कल्पना डोक्यांतून काढायला ते तयार होतील तेव्हां त्यांना हें पटायचं...

" इन्कीलाब झिंदाबाद...इन्कीलाब झिंदाबाद..."

समोरून कामगारांची एक मिरवणूक जाऊं लागली, तेव्हां रस्ता ओलांडणाऱ्या रघुनाथाला थांबावंच लागलं. त्या गर्जना आणि घोषणा त्याच्या कानांत शिरूं लागल्या....–

कुणाचा निषेध आणि कोणावर मोर्चा ? मालक आहोंत आपण जमिनीचे...पिटून देखील काढतील...भिवा तसा आडदांड राक्षस आहे...दहा जणांना ऐकणार नाहीं एकदां उलटला म्हणजे...

...पि...टू...न...पि...टू...न...

आपण देखील आडदांड आहोंत...त्या दिवशीं थिएटरजवळ झालेल्या मारामारींत चार मवाल्यांना लोळवलं आपण...आपल्या-बरोबर मारी आली होती तिची चेष्टा करीत होते लेकाचे...असे पिटले, असे पिटले...पण लोकहि आपल्या मदतीला धांवून आले म्हणून आपण वाचलों त्यावेळीं...लोकांना वाटलें मारी आपली बायकोच आहे...आणि लोकांना तसा भास होतोय असं पाहून काय पण अगदीं गुदगुल्या झाल्या आपल्याला...अंदर की बात समजली असती तर लोकांनीं आपलीच चटणी उडवून टाकली असती...

साहेबांना असेंच पिटून त्यांची चटणी उडवली तर...? लई गमजा करायला लागली आहे ही स्वारी...वर्षावर्षांत रजा देत नाहीं. शेटजींच्यापुढें गोंडा घोळून स्वतःपुरती पगारवाढ करून घेतो...आणि आम्हाला सांगतो कीं हें देशाचें काम आहे.

...गों...डा...घो...ळू...न...

गोंडा घोळून एकदा उपसंपादकाची खुर्ची मिळाली कीं...

स्टेशनांत येऊन रघुनाथानं पिऱ्याकडून आपलं ' सामान आपल्या ताब्यांत घेतलं. पिऱ्यानं आशेनं रामराम केला. चडफडत रघुनाथचे हात खिशाकडे वळले आणि पिऱ्याच्या हातावर एक अधेली पडली. पिऱ्या खुषींत निघून गेला.

–असें धांवत जावें आणि पिऱ्याला गांठून त्याला खरपूस चोप द्यावा आणि त्यानं हंसून लुबाडलेली अधेली परत काढून घ्यावी...पण द्यायला सांगितली होती कोणी !...कोणी म्हणजे ! जुन्या खानदानी घराण्यांतली पद्धत आहे ती. आपले आजोबा म्हणे कोणींहि येऊन त्यांना नमस्कार केला कीं पेटींतून ओंजळीनें पैसे काढून देत असत. कुळं त्यांना म्हणायचीं कीं सावकार म्हणजे लोणकढं तूप आहे...आपल्याला कोण म्हणणार आहे म्हणा तसं...अधेली तर गेलीच पण एकादेवेळीं चांगला खरपूस मारहि मिळावयाचा... या समोरच्या पारशी म्हाताऱ्याला असेंच लाचारीनें हंसून नमस्कार ठोकूंया काय ! कपडे कसे छानछोकीचे दिसताहेत... तेवढीच गेलेली अधेली परत मिळेल.

गाडी प्लॅटफॉर्मवर घुसतांच गर्दी उसळली. धक्काबुक्की करीत तो आंत चढला. बसायला जागा नाहीं म्हणून मधेंच गर्दींत तो उभा राहिला. श्वास गुदमरूं लागला म्हणून टाचा उंच करून त्यानं गर्दींतून बगळ्यासारखी मान उंच केली. त्याच्यापुढें दोन सुटाबुटांतले पोरसौदा तरुण उभे होते. त्यांच्या खिशांतून स्टेथॉस्कोप डोकावत होते. ते कांहींसें बोलत होते. त्यावरून रघुनाथनें ताडलें, कीं ते कुठल्यातरी मेडीकल कॉलेजमधील विद्यार्थी असावेत, कुठल्याशा अपघाताबद्दल ते बोलूं लागले. एक दुसऱ्याला विचारतो–" त्या सात नंबरचं काय झालं रे ! " दुसरा म्हणतो–" दोन दिवस प्रेत ठेवून अखेर बेवारशी ठरवून दिलं म्युनिसीपल अधिकाऱ्यांच्या ताब्यांत ! करणार काय दुसरं ! " पहिला

म्हणतो–" बावळाच आहेस तूं, बेवारशीच होतं तर तूं तें चिरफाडीला नाहीं घ्यायचं ? "

" अरे पण चिरफाड करणार कशाची ? सगळी बॉडी छिन्नविच्छिन्न झाली होती लोकलगाडीखालीं सांपडून. "

" डॉक्टर स्मिथसन् आला नाहीं वाटतं धांवून तुरुतुरु मेंदू काढून घ्यायला ? कोणी मेला म्हणजे या स्मिथसन्‌ला आनंद. लागलीच चिर-फाड करून मेंदू बरणींत ठेवून देतो. बरण्या भरभरून ठेवल्या आहेत लॅबोरेटरीमध्यें. काय लेकाचा लोणचं घालणार आहे कीं काय कुणास ठाऊक ! " दोघंहि खदखदले.

दुसरा म्हणतो– ' आला असता, पण सगळा मेंदूच चिरडला होता. मग नुसता हाडांचा सापळा कशाला ताशीत बसायचं ? "

...सगळा मेंदूच चिरडला होता...मग हाडांचा सापळा कशाला ताशीत बसायचं !...

चिरडलेला मेंदू...चि...ड...ले...ला...में...दू...

आपला मेंदू चिडला आहे नाहीं ?...साहेबाला मिळाला तर काय आनंद होईल ?...या समोरच्या पगडीवाल्या इसमाचें डोकें कसें छानदार वाटोळें...आणि तासलेंहि कसें गुळगुळीत चमनगोटा...भांडण काढून प्रथम त्याला चिडवूंया...आणि लागलीच मारून मेंदू काढून घेऊं म्हणजे झालं...साहेबाकडे दिला पाठवून कीं लागलीच नोकरींत बढती... पगडीवाला मेला म्हणून घरीं आकांत...बायकामुलं देशोधडी...आणि जागा आपल्याच ताब्यांत...आपण मारलाय त्याला. जागा आपल्यालाच मिळाली पाहिजे...वाटल्यास पावती घेऊन मग मारूंया त्याला...लोकल-खालीं कशाला ? देऊया गिरणगांवात भिवाच्या स्वाधीन करून... चांगला पिटून पिटून मारील तो याला...

दादर येतांच रघुनाथ पुन्हा एकदां धक्काबुक्की करीत उतरला. दोन मिनिटांत तो बोर्डींगमधील आपल्या अंधाऱ्या खोलींत येऊन दाखल झाला, प्रवाशी सामान त्यानं अस्ताव्यस्त कॉटवर पसरलें आणि विषण्ण मनानं तो कपडे बदलून आरामखुर्चीवर लवंडला.

संध्याकाळचे साडेसात वाजून गेले होते. भोजनगृहांत गिऱ्हाईकांची वर्दळ वाढली होती. कौंटरवरील खजीनदाराची वाढप्यावरील खेंकसणी, काम करणाऱ्या पोऱ्यांचे आपसांतील तंटे, रेडिओंतून अहमद इस्माईल आणि पार्टीची तार स्वरांत चाललेली कवाली, पलीकडे स्नानगृहांत सायंस्नान करणाऱ्या कोणा अवलीयाचें स्नानसंगीत, आणि रस्त्यावरून दर मिनीटागणिक फराटणाऱ्या वाहनांचे भगभगीत आवाज-यांचें मिश्र संगीत ऐकून त्याचीं आधींच शिणलेलीं गात्रें अधिक शिणलीं आणि त्याचे कान बधीर झाले.

पलीकडे दाढीच्या सामानांत पडलेली एक रहस्यकादंबरी त्यानं उचलली आणि चाळली. पण तिचीं पहिलीं आणि शेवटची पानें फाटून गेली होतीं. चिडचिडून त्यानं ती दूर भिरकावली. टेबलावर एक जुना इलस्ट्रेटेड विकलीचा अंक पडला होता, तो त्यानं हात लांबवून घेतला आणि तो पानामागून पान उलटीत उगीचच चित्रं पहात चाळूं लागला.

... शब्द ! शब्द ! शब्द ! ... सारे शब्द पुसून ... किंवा त्यावर व्हायटींग ओतून ... किंवा डांबर फासून ... नुसती चित्रें उरतील तर ... खास तारांचीं भाषांतरेंहि करायला नकोत आणि तीं प्रुफेंहि तपासायला नकोत...

क्रॉसवर्ड कोड्याचें पान आलें तसा तो थबकला. आडव्या उभ्या चौकटी त्यानें न्याहाळल्या. सूचक विधानें पाहिलीं आणि मग पानाच्या डोक्यावर रंगीत अक्षरांत चमकणारा वीस हजारांचा आंकडा त्यानं पाहिला. त्याखालीं छापलें होतें – " तुम्ही पंधरा हजार रुपये रोख स्वीकारणार

कीं एक स्वित्झर्लंडचें परतीचें तिकीट, एक रेडिओ सेट आणि नऊ हजार रुपये रोख पत्करणार तें ठरवा-.... "

...-त्यांत ठरवायचं काय आहे ? स्वित्झर्लंडला जायला या चांडाळ साहेबानें रजा तर द्यायला हवी ? आणि रेडिओ घेऊन ठेवायचा कुठं ? त्यापेक्षां पंधरा हजारांतील सहा हजार रुपये पागडी भरून....

विमलच्या नवऱ्यानं नाहीं पागडी भरून ब्लॉक घेतला खारला ! बायका-पोरांना घेऊन कसा मजेंत रहातोय. आपल्यासारखा तारांचीं भाषांतरं करीत बसलेला नाहीं तो वर्तमानपत्र कचेरींत.सप्लाय डेपोमध्यें राजा होऊन बसलाय. चार आमदार हाताशीं आणि छोटी मोटर उशाशीं...काय बिशाद आहे कोणीं डोळा वटारून पाहील ?...आमदारांच्याबरोबर कुठल्या कुठल्या सभेला जातो. व्याख्यानं देतो, आणि...आणि...नांवहि येतं त्याचं वर्तमानपत्रांत छापून...आपलं नांव एकदां परीक्षा पास झालों होतों तेव्हां आणि नंतर लग्नाच्या निमंत्रण पत्रिकेंत आलं होतं छापून...नांव छापून यायला पराक्रम करावा लागतो...आपण रडतरावू कसला बोड-क्याचा पराक्रम करणार ?...एक सारंगी होती ती पडली आहे झुरळ-उंदरांशीं खडबड करीत...पराक्रम करायला पायाखालची जमीनदेखील स्थिर पाहिजेना ?...भूमीनेंच जिथें टाळेबंदी पुकारली तिथें पावलांनीं कुठवर धर धरावा ?

निळ्या आकाशीं
तरंगे डौलांत, निष्पाप तेजाळ
एक चंद्रबिंब !
कोणे एके काळीं हृदयामधें पाझरूं लागतें चंद्रबिंब हें
स्फटिकासारख्या शुभ्र सुन्दर चांदण्याच्या धारा.
चांदण्याच्या धारा लाव्हा रसापरी
अंतरांतलें सारें अमंगल
जाळून पोळून करीती खांक.

आणि आलेले कल्पकतेचे चिमणे पक्षी
ओलांडुनीयां अनंत दुःखांचे तप्त सागर,
चंद्रबिंबामध्यें न्हाऊन आतां,
खाऊं लागती मोतीयाचा चारा.
तोंच कडाकडा खाऊन दांत,
विक्राळ फाकून राक्षसी जबडे
शेंकडों हजारों राहू आणि केतू
दाही दिशांतून गिळाया धांवले
पाहून एकाकी चंद्रबिंब हें.
चिमणे पक्षी धांवूं लागती
सैरावैरा कोठें शोधाया निवारा.
त्यांतील कोणी एकांडे कर्ण,
घेऊन पाठीशीं आत्मबलाच्या अनंत सिद्धि
उभे ठाकीती कराया संग्राम
रक्षाया आपुली पवित्र वेदी.
अक्राळविक्राळ जबडे पुढें
करीती त्वरेनें उघडझांप
खाऊन कॉवळें चिमणे सैनिक
लवलवणारी जीभ त्यांतून मागून पुढून घासून पुसून
दांतांच्या सुळ्यांना लावीते धार.
आणि अचानक,—
मागून पुढून सुटले तीव्र विषारी बाण,
तेजोभंगाचे,
सारथ्याचें दान देणाऱ्या कोणा हजारों शल्यांचें.
मागून पुढून भिडत्या शत्रूला
रक्तानें न्हालेले चिमणे पक्षी
एकवटूनीयां बळ आपुलें
भीडती त्वेषानें

रक्षाया आपुली पवित्र वेदी.
आणि आतां ही पवित्र वेदी
गिळूं लागली चिमण्या पक्ष्यांच्या रथाचें चाक.
पायाखालची जमीनहि आतां
सागरांतल्या पायाखालच्या वाळूंप्रमाणें खचूं लागली.
कोठवर या आत्मबलाच्या अनंत सिद्धि
रक्षितील या चिमण्या पक्ष्यांना ?
कोठवर हीं दधीचीं-वज्रें भिडतील या विक्राळ सुळ्यांना ?
निळ्या आकाशीं
कोठपर्यंत विहार करील निष्पाप तेजाळ
हें चंद्रबिंब ?...—०००

रघुनाथ समाधींतून जागा होऊन पुन्हा हातांतल्या अंकाकडे पाहूं लागला. तिसऱ्या नंबरच्या चौकटींत आडव्या अक्षरांपैकीं " एच्, ओ + ई " हीं अक्षरें त्याच्या नजरेंत भरलीं. मधलें एकच अक्षर भरायचें होतें. त्यानें सूचक विधानाकडे पाहिलें. सूचक विधान म्हणत होतें कीं—" या " शिवाय आयुष्य म्हणजे जंजाळ आहे. रघुनाथनें डोळ्याला ताण देऊन तीं अक्षरें पुन्हां न्याहाळलीं.

कोडं तयार करणाऱ्या माणसालादेखील आपलं दुःख समजलेलं दिसतंय...' एच् ओ एम् ई '...वा ! आपल्यालादेखील ही भानगड जमूं शकते कीं ! आतां काय उरलेलीं पांच सहा अक्षरं भरायचीं कीं पं..ध..रा ह..जा..र रु..प..ये...

पंधरा हजार रुपये कीं छानदार जागा...

छानदार जागा कीं,...छोटीशी मोटर,...छोटासा रेडिओ,...आहे का पण मिळण्याची कांहीं आशा ?...आ...शा...आ...शा...' एच् ओ पी ई '...'पी',..'पी'...अरेच्या ! हा 'पी' देखील बसतो आहे कीं या चौकटींत ?...

" घर " नसेल तर आयुष्य जंजाळ आहे...

" आशा " नसेल तर आयुष्य जंजाळ आहे...

कोणता शब्द बरोबर आहे?...दोन्हीहि शब्द बरोबर आहेत! हा संपादक पाजी, बदमाश आहे! शब्दावर कसरती करून पैसा उकळण्याचा राजरोस धंदा चालविला आहे, शरम नाहीं वाटत? माणसाला उगीचच आशा लावायची म्हणजे काय?...

रघुनाथानं चिडून अंकहि दूर भिरकावला...–

–...चोर..,पाजी...बदमाश...माणसाला उगीच आशा लावावयाची म्हणजे काय?...रजा द्या म्हणून कांहीं पाया पडत कोणी गेलें नव्हतें साहेबांच्याकडे? गंमत म्हणून नुसता अर्ज टाकला तर मोठ्या ऐटींत मंजूर करून बसले. मग वाढवली असती एकाद्या दिवसानें तर कांहीं चार चव्वल गेले असते स्वतःच्या घरांतले? देशाचं काम करताहेत म्हणे...आणि तो साहेबांचा खाजगी चिटणीस–, त्याला दाखवलाच पाहिजे आपला कोंकणांतला हिसका...साहेबांचा हुकूम जरा डोकं ठिकाणावर ठेवून ऐकला असता तर कांहीं बिघडलं असतं? ...कामं करतात कीं हजामती करतात?...डिस्मिस् करून टाकले पाहिजेत असले गबाळे लोक....

तारांचीं भाषांतरं करतां कीं हजामती करतां? डिसमिस् करून टाकले पाहिजेत असले गबाळे लोक.... " पण साहेब–"...साहेब बिहेब् कुच् नाय! सरळ डोकं ताळ्यावर ठेवून काम करायचं असलं तर उद्यां ऑफिसमध्यें पाऊल ठेवा, नाहींतर....

वा, काय पण तंबी दिलीस साहेबांनीं!

तसंच या खाजगी चिटणिसाला..." चुकून याचा अर्थ काय? अशा ' चुका ' चुकून तरी होतात कशा? घरीं जायचं म्हणून त्या माणसानं येवढी तयारी केली, त्याच्या मनाला येवढी आशा लावलीत रजा देऊन

आणि आतां खुशाल रोलर फिरवून कोमल भावनांचा चिरडून खून करून शकतां ! काळ्या पाण्यावर जाल याद राखा..."

..." मानवता " किंमत एक आणा...

' रघुनाथराव देसाई यांच्या कोमल भावनांचा अमानुष खून ! मुख्य संपादकाच्या खाजगी चिटणीसांना अटक '...

मानवता किंमत एक आणा...किंमत एक आणा...–०००

" काय म्हणालांत ?" दचकून भानावर येत रघुनाथ म्हणाला. पलीकडील एका खोलींतून गोवानीज फर्नांडीझ डोकावत विचारत होता–
" एक आणा पॉईंट लागलाय, खेळणार काय ? "

" श्रीज ना ! अवश्य ! खेळायचं नाहीं तर दुसरं काय करायचं ! "

रघुनाथ गडबडीनें उठला आणि कोटाच्या खिशांतलें पैशाचें पाकीट शर्टच्या खिशांत टाकीत आणि धोतराचा सोगा खांद्यावर टाकीत तो बाहेर पडला. पलीकडच्या खोलींत पाऊल टाकतांच टेबलाभोंवतीं कोंडाळें करून बसलेलीं माणसें हंसत ओरडलीं–" आइये आइये जनाब. " किंचित खालीं झुकून नाटकीपणानें तें स्वागत स्वीकारीत रघुनाथ स्थानापन्न झाला. पत्ते वाटले गेले. डाव सुरू झाला. एकमेकांवर कॉल्स चढूं लागले. रघुनाथाच्या समोर बसलेला त्याचा भिडू नवशिका आहे हें रघुनाथनें पाहिल्या तीन कॉलमधेंच ओळखलें. आणि त्याचें खेळाडू रक्त चिडचिडत उसळलें. नवशिक्याच्या शब्दावर विसंबून त्यानं भारी कॉल फेकले आणि ते आंगावर कोसळले. साथीदाराचा डाव हातांत घेऊन त्यावरून नजर फिरवतांच त्यानं ओळखलं कीं आपण पुरे चीत झालों. जळफळत त्याचा डाव सुरू झाला. आणि डाव संपला तेव्हां तो चारी मुंडे चीत झाला होता. प्रतिपक्षियांनीं डोळांत पानें जेव्हां भिरकावलीं तेव्हां रघुनाथ आपल्या साथीदारावर कडाडून तुटून पडला आणि त्याच्या चुकांबद्दल तो त्यास फैलावर घेऊं लागला. साथीदाराचा स्वाभिमान

दुखावला आणि तोहि उसळून तणतणूं लागला. त्या भांडाभांडींतच खेळ उधळला. रंघुनाथ आपल्या खोलींत फणफणत परत आला.

कामावरून परत येऊन कपडे काढीत असलेल्या मद्रासी अय्याकडे पाहून तो गुरगुरूं लागला. "...हजाम लेकाचे...खेळतां येत नाहीं आणि आणा पॉईंट लावून बसताहेत खेळायला···वाटेल त्यानं खेळायला हा काय झब्बूचा खेळ आहे काय?···खुळखुळताहेत खिशांत पैसे म्हणून ही मस्ती आहे..." रघुनाथनें तणतणत पैशाचें पाकीट बॅगमधें टाकलें. जेवण करून घ्यावें म्हणून तो भोजनगृहाकडे वळला. शिणलेल्या पावलांनीं तो मधल्या बोळांतून जात असतांना कोणी तरी त्याला हंसून नमस्कार केला. चडफडून नाइलाजानें त्यानें नमस्कारासाठीं हात उचलले. भोजनगृहासमोर येणाऱ्या जाणाऱ्या गिऱ्हाइकांच्या वर्दळीकडे काकनजर लावून मालक बकध्यान करीत बसले होते. हाताची बोटें ऑर्गनवर फिरत होती, आणि समोर एक नवशिका तबलेवाला तबला बडवीत होता. खानावळीचा प्रपंच सावरल्यापासून मालकहि आपला शौकीनपणा मिरवून घेत होते. रघुनाथला पाहताच ऑर्गन दूर सारून मालकांनीं त्याला पुकारलें. चडफडत तो खोलींत शिरला. तबलेवाल्यास रजा देत मालक म्हणतात—" बसा बसा हो देसाई···घ्या, पान सिगरेट.." रघुनाथ मानेनेंच नाहीं म्हणतो. मालक—'कुच फिक्र नहि' या थाटांत स्वतःच पानबिडीचा स्वाद घेत विचारतात—

"हूं! मग सांगा पाहूं आजची कांहीं खास बातमी? खास बातमी पाहिजे हं···"

" खास बातमी... कांहीं विशेष नाहीं."

" अहो नाहीं कशी? वर्तमानपत्राच्या कचेरींत राहून तुम्ही बुवा अगदींच मुक्तपणानं काम करतां! खरं म्हणजे तुम्ही त्या दादासाहेबांच्या पोटांत शिरून···बरं, जाऊंद्या. आम्ही सांगतों तुम्हांला

खास बातमी. सरदार पटेलांनीं नेहरूंना असा दम भरलाय म्हणतां त्या परवाच्या आपल्या ह्या प्रकरणावर...अहो पाकिस्तानांतल्या मुसलमानाची मस्ती जिरवावी तर या पठ्ठयानेंच...नेहरूंत तर कांहींच दम नाहीं...तुम्हाला पटायचं नाहीं आमचं म्हणणं इतक्यात. ''

'' अहो पटेल कसं ? ''–जेवण आटोपून बडीशेप तोंडांत घालतां घालतां उपरणं सावरीत आत येत एक गिऱ्हाईक म्हणालें. आंत येऊन गादीवर स्थानापन्न होत सदर गृहस्थ सलगीच्या स्वरांत शिरा ताणून म्हणतात–'' आम्ही विचारतों, की या काश्मीरच्या प्रकरणांत यू. नो. कडे जाण्याची काय जरुरी होती आमच्या धर्मराजांना ? चक्क युद्ध पुकारून प्रदेश जिंकून घ्यायचा आणि पाकिस्तानवाल्यांना सांगायचं कीं बसा आतां बोंबलत...''

त्यांच्या पाठोपाठ आणखी दोनतीन इसम आंत घुसत म्हणतात– '' भेंडीबाजारमध्यें दंगा झालाय म्हणे...''

'' दंगा ! अहो तीनशें हिंदूंचे मुडदे पडलेत आहांत कुठं ? आणि आपण बसलों आहोंत इथं चणेफुटाणे चघळीत...''

मालक म्हणतात–'' अहो तो खालचा जाफरभाई शूमार्टवाला तुमच्या आमच्या उरावर इथं पाकिस्तान मांडून बसला आहे. आहे का हिम्मत तुमची त्याचं दुकान साफ करायची ?...''

जमलेल्या विद्वत्परिषदेचा फायदा घेऊन त्रासलेल्या मनानें रघुनाथ हलकेच उठला आणि काढता पाय घेऊन बाहेर पडला. मालक स्वतः शिरा ताणून सरकारला फैलावर घेत होते. त्यामुळें त्याचें पलायन त्यांच्या लक्षांत आलें नाहीं.

रघुनाथ कौंटरशेजारून जाऊं लागला. तोंच–

'' अहो देसाई–'' रघुनाथनें वळून पाहिलें. आपली रंगलेली बत्तीशी

विचकत छोटे मालक उर्फ खजीनदार त्याला हांक मारीत होते. रघुनाथच्या कपाळावर आंठ्या उमटल्या.

" बसा हो देसाई. इतक्यांत काय घाई आहे जेवायची ? "

" बरं वाटत नाहीं आज मला "

" कां --! पार्टी चुकली म्हणून वाटतं ! "

" कसली पार्टी ? "

" आम्हांला कळतात म्हटलं चोरून केलेल्या मेजवान्या ! तुम्ही नाहीं सांगितलं तरी तुम्ही गेल्यानंतर तुमची चौकशी करायला ती फटाकडी आली होती ना ? "

" फटाकडी ? शट् अप्! तोंड सांभाळून बोलत जा ! " त्वेषानं गुरकावून रघुनाथ आंत गेला. खजीनदार आ वासून पहातच राहिला. मोकळ्या झालेल्या एका टेबलासमोर रघुनाथ बसला. जुनें ताट उचलून वाढप्यानें हातांतल्या मेणचटलेल्या फडक्यानें टेबलाचा दगडी पृष्ठभाग पुसल्यासारखें केलें. आणि दुसऱ्या, त्याच्या इतक्याच कळकट माणसाने रिकाम्या टेबलावर धुतलेलीं तार्टे दाणदाण आदळीत, त्याच्या समोर एक ताट आणून आदळलें आणि तो चालता झाला. भराभरा ठराविक पदार्थ वाढले गेले. जेवायला सुरवात करायच्या आधीं रघुनाथनें कूपन फाडून दिलें. कडंग काळसर पोळीचा तुकडा मोडून त्यानं तोंडांत घातला आणि चव आणण्यासाठीं तो चघळूं लागला.—

...—फ..टा..क..डी...फ...टा..क..डी...

मारी !...माऽऽरी !...डाऽऽ लींग !...डाऽऽर्लींऽग ! ...

...बाटलीवालाकडे जेऊं...नंतर मेट्रोला जाऊं...आणि मग काय रात्र आपलीच...रा...त्र...आ...प...ली...च...

मारी...आपलीच...आ...प...ली...च...

आपलीच इंदुमती...सर्वस्वी आपलीच इंदुमती...

..." अरे तुला आवडतं म्हणून मुद्दाम संध्याकाळीं मळ्यावर जाऊ
आमसुलं आणून सूनबाईनं पन्हं केलंय"... "पण आई माझं पो
भरलंय......" आपल्या माणसांना पाहूनच वाटतं ? ...आ...प..
र्ली...मा...ण...सं...कुठं आहेत आपलीं माणसं ?...

कुठं आहे त्यांची माया ? कुठें आहे त्यांची ममता ?

...मा...या...म...म...ता...प्रे...म...—

" सबंध आंबून गेलीय ! मॅनेजरसाहेब, काल भाजीला विरजण
लावलं होतं कीं काय ?" हॉलमधें हंशा, दंगा झाला.—

...कशाला विरजण घातलें ? काय आंबलें ?...

...मा...या...म...म...ता...प्रे...म...

माया आंबली. प्रेम आंबलें. ममता आंबली. माणुसकीदेखील आंबली

आंबून...आंबून...आंबून दारू झाली...

दारू पिऊन डोकें फिरलें...डोकें झिंगलें...

आंबलेल्या प्रेमाची दारू काय पण चढते...?

डोकें झिंगलें... डोळे फिरले...

जळ जळ...सर्वांगाला ठणका लागला...

डोळ्याला कांहीं दिसेना...मनाला कांही सुचेना...

आपलीं माणसें राहिलीं चारशें मैल दूर...

आतां पुनः रजा मिळून जायला सहा महिने दूर...

आगगाडीनें जायला चोवीस तास दूर...

खास विमानानं अर्ध्या तासांत दूर...

अवघ्या अर्ध्या तासांत लोकलनें बाटलीवालाच्या घरीं...आपलीच...मार

फक्त...माझ्यासाठीं, आजचा दिवस नाहीं कां राहतां यायचं तुम्हांला
मी तुम्हांला आवडतें ना ?

...हें काय विचारणं ?...

मूर्ख ! मूर्ख ! हें काय उत्तर झालं ?...उत्तर कसें, तिला जवळ घेऊन, तिच्या कानाशीं ओठ नेऊन...तुझ्याशिवाय मला दुसरं कोण आहे प्रिये बरं ?...मला फक्त तूं हवीस !...मला फक्त तूं हवीस !

" काय हवंय आपल्याला ? " वाढपी पानासमोर खोळंबून विचारत होता. रघुनाथ बावचळून अर्धवट भानावर आला.

...मला काय हवंय ?...मला इंदुमती हवीय...

...शिल्लक नाहीं...

...मग मला मारी हवीय...मला आपलं माणूस हवंय...

" अं–अं ? " रघुनाथ गुरगुरला.

वाढपी म्हणतो–" तस नव्हे, पातळ भाजी हवीय कीं काल्यांची भाजी घेणार ? "

रघुनाथ मानेनेंच ' नाहीं ' म्हणून सांगतो. वाढपी पुढें जातो.

...भाजी न वाढतां हा पुढें का गेला ?...आग्रह करून वाढायला तो काय इंदुमती आहे ?... जाईना का ! आपल्याला कुठें काल्यांची भाजी आवडतेय ! शी ! शी! काय जेवण हें?...बाटलीवालाकडे खुमासदार पदार्थांची अगदीं रेलचेल उडाली असेल...मारी काश्मिरी साडीमध्यें मोठी मोहक दिसत असेल नाहीं ? ...थट्टा,विनोद, नाच, गाणीं, आरडा-ओरडा, दगा...

बसा आतां आढ्याकडे पाहून दिवसावर रात्र उगाळीत...बाटलीवाला पारशी कॉलनींत राहतो...लोकलनें पांच मिनिटांत माटुंगा...कीं पंधरा मिनिटांत बाटलीवालाच्या घरीं...कर्रर...कर्रर...दारावरची घंटा खणखणते...बाटलीवाला आंतला जल्लोष सोडून बाहेर धांवतो...दार उघडतो...रघुनाथला पाहून म्हणतो..." हॅल्लो...कोण रघुनाथ ? आलास तूं ?...मारी, ए मारी...धांव, पळ कोण आलंय बघ तरी ? " मारी जेवण

अर्धवट टाकून येते..." आलांत तुम्ही ? माझ्यासाठीं ?" होय, अगदीं तुझ्यासाठीं...आतां मी कुठंहि जात नाहीं...आंबलेल्या मायाममतेची झिंग चढली आहे ना?...आतां तूं माझी अन् तुझा मीच ... आजची रात्र आपलीच..."पिक्चरला जायचयं ना?...नको,मारी मला तूं हवी आहेस. ...तुझ्या कुशींत शिरून मला खूप खूप रडायचं...अय्या रडायचं कशाला ! आपण बोलूंया, खूप खूप हंसूया, नाचूंया...बाटलांवाला, एक्स्यूज मी. मी यांना घेऊन घरीं जातें...आता रात्र फार झाली "..." बरं, आहे बुवा ...या डार्लींगसाहेब...स्वीट ड्रीम्स "... ' चल् ए फाजील "...

रघुनाथ गडबडीनें जेवण आटोपून आंचवून आपल्या खोलींत आला. घाईघाईनें त्यानें भपकेदार ठेवणींतला पोशाख केला. मारीनें दिलेल्या अत्तराचे फवारे आंगावर धडवून घमघमाट केला. आणि तो बाहेर पडला. रेडिओवर रेकॉर्ड लागली होती—" किस्मत हमारे साथ है, जलनेवाले जला करे "...

खजीनदार त्याचा थाट पाहून चाट झाले. ते विचारतात—" कुठं ! कुठं गाण्याला वाटतं ? "

रघुनाथ खुषींत खेंकसला--" मग कुठं, कीर्तनाला ? " आ करून पहात राहण्याची खजीनदारावर ही दुसरी पाळी. खालीं जातां जाता रघुनाथ ओरडला—" रात्रीं मी येणार नाहीं हो आज —"

रघुनाथ अगदीं खुषींत भराभरा रस्ते ओलांडत चालला आहे. जातांना उगीच कुणाला तरी दोन धक्के मारावे अशी मनांत उबळ येत आहे. निदान घाईघाईनें जाणाऱ्या एकदोन अवलीयांना जबरदस्तीनें हाताला धरून थांबवावें आणि त्यांना घेऊन भर रस्त्यावर नाचायला आरंभ करावा अशी इच्छा होत आहे.

कुणाकडे तरी पाहून पोटभर हंसावें, कुणाला तरी तार स्वरांत आणि बेसूर वेड्यांवाकड्या आवाजांत गाऊन दाखवावें, अशी लालसा होत आहे. पण कांहींहि न करतां रघुनाथ डौलांत पावलें टाकीत लोकल स्टेशनच्या आवारांत येतो. तिसऱ्या वर्गाच्या तिकीट ऑफीससमोर उभ्या असलेल्या छोट्या रांगेकडे उगीचच तिरस्काराची नजर टाकून तो गुणगुणत- " किस्मत हमारे साथ है, जलनेवाले जला करे..." पाहिल्या वर्गासाठीं ठेवलेल्या खास खिडकींतून हात घालत रुपयाची नोट आपटून ओरडतो- " एक माटुंगा.-"

किडक्या नजरेच्या कारकुनानें जांभई देऊन बाहेर पाहिलें. आणि मग तिकीट खटकून रघुनाथपुढे मोडेच्या खुर्द्यासकट सरकावलें. मोडीचा खुर्दा खिशांत घालीत रघुनाथ वळतो. तेवढ्यात....

" साहेब पालीश ? " लक्तरे ल्यालेला एक छोकरा केविलवाणी मुद्रा करून विचारतो. रघुनाथ खुशींत गुरकावून म्हणतो-" चल झटपट ! गाडी यायच्या आंत हं ! " रघुनाथचा पाय हातांत घेऊन छोकरा बुटाचा बंद ढिला करीत...--

...किस्मत हमारे साथ है...--

" पान बिडी माचीस सिगरेट .."

" ए पानवाला-"

" जी साब-"

" एक पान और एक सिगरेट होना..."

कडवट पानावर सिगारेटचा उग्र भपकारा घेतांच रघुनाथला ब्रह्मांड आठवतें. प्लॅटफॉर्मच्या कडेला जाऊन तो पान थुंकून टाकतो आणि सिगारेट फेकून देतो.--

...संवय नाहीं तर कशाला ओढायची सिगारेट ? संवय नाहीं तर

कशाला खायचें पान ? ... संवय नाहीं तर कशाला प्रेमाचे चाळे ? आंबलेल्या प्रेमाचे चाळे...सं...व...य...सं...व...य...

संवय कशाला हवी ? उगीच गम्मत म्हणून...

ग...म्म...त... ग...म्म...त

गम्मत म्हणून पान...गम्मत म्हणून सिगारेट...

गम्मत म्हणून मारी...

गम्मत म्हणून इंदुमती...—

धाड् धाड् आवाज करीत गाडी प्लॅटफॉर्ममधें घुसली. त्याबरोबर गर्दी उसळली. गडबडीनें रघुनाथ पहिल्या वर्गाच्या दारांतून आंत घुसून त्यानं खिडकीपाशीं जागा पटकवली. क्षणभरांत गाडी पुन्हा धांवू लागली...

...गाडी तर सांपडली...सां .प..ड..ली...

किस्मत हमारे साथ है...काय मघाचा तो अवतार !...एका हातांत बॅग.. दुसऱ्या हातांत होल्डॉल...केस पिंजारलेले...घामानें चेहरा डबडबलेला...धाप लागलेली..पळताहेत, पळताहेत...छुत् !...

आतां गाडी सांपडली...मारी सांपडली...रात्र सांपडली...

जलनेवाले जला करे ...

माटुंगा येतांच रघुनाथ खडबडून भानावर येऊन खालीं उतरून धक्काबुक्की करीत बाहेर पडूं लागला....

...—किस्मत हमारे साथ है...मग करा हवी तेवढी धक्काबुक्की. बाहेर येतांच त्यानं एका टॅक्सीला खुणावलें. गाडी जवळ येऊन उभी राहतांच आंत बसत त्यानं बाटलीवाल्याच्या बंगल्याचा पत्ता दिला. गाडी धावूं लागली.

...आधीं मारीची क्षमायाचना...या..च..ना...प्रेमयाचना..मारीला उगीच दुखावलं दुपारीं...मारीनं काश्मीरी साडीच नेसली असेल काय ?

...ते भावूक टपोरे डोळे..ती मोहक जिवणी...तें रसरशीत यौवन... आणि मग काय ती रात्र आपलीच...

घर्रर्र, घर्रर्र ! गाडी थांबतांच रघुनाथ अधीरपणानें उतरला आणि पैसे चुकते करण्याआधींच छोटी पाऊलवाट तुडवीत.......

बंगल्यांत तर सामसूम दिसतेय ? पार्टी आटोपून मंडळींची पांगापांग तर नाहीं झाली ?

तो दारापाशीं आला. त्यानं घंटेची कळ दाबली. एकदां..दोनदां.. तीनदा. आंतून संथ पावलांचा फरशीवर आवाज..दिवा लावला. एक स्थूल आंगाची पारशी म्हातारी बाई ट्रेलीसमधून डोकावून पाहून विचारते–" कोण पाहिजे ? "

" होमी कुठाय ? "

" होमी संध्याकाळीच मित्रमैत्रिणींना घेऊन एम्पायर हॉटेलमधें गेला आहे···"

काय मूर्खपणा तरी ? होमी इतक्या माणसांना घरीं कसा जेवायला घालील ? आधींच लक्षांत यायला हवं होतं आपल्या. आधीं चौकशी करूं नाहीं आपण ?...

" बरं जातों मी –" खट्टू होऊन रघुनाथ परत वळला. म्हातारी विचारीत होती–" कोण आलं होतं म्हणून सांगूं ? " रघुनाथला वळून उत्तर देखील द्यावेंसें वाटलें नाहीं. परत येऊन तो टॅक्सीमधें बसला. टॅक्सीवाला अदबीनें विचारतो–" कुठं घेऊं गाडी ? "

रघुनाथ म्हणतो–" एम्पायर हॉटेल...' गाडी भरारा धांवूं लागली.

...जलनेवाले जला करे...एव्हांपावेतों मंडळींचें जेंवणदेखील आटोपलें असेल. आणि भूक तरी अशी सपाटून लागली आहे...आपण खानावळींत जेवलों तें काय जेवण म्हणायचं ? काय ती कडंग पोळी... आंबलेली भाजी...आं...ब...ले...ली...

आंबलेली माया, आं ब ले ली म म ता...मा...री...

मारीला घेऊन तिच्या घरीं गेल्यावर तिला म्हणायचं–" ए छोकरी, आपल्याला बुवा भूक लागलीय!..." अहो पण या वेळेला काय करून घालूं तुम्हाला ? जेवणखाण तरी आटोपून यायचंत..."..." मला तूं हवी होतीस...त्यापुढं जेवणखाण कसं सुचणार ? "..." चला ! यू नॉटी डेव्हील...आणि सकाळी काय म्हणत होती स्वारी कीं..." " उं ! सकाळचं जाऊंदे ग...सकाळचा रघुनाथ होता बावळा...आतां कुठं उरलाय तो रघुनाथ ?...आंबलेली माया पिऊन या रघुनाथचं डोकं झिंगलंय तोपर्यंत तुला काळजी नाहीं !..." बरं काय करूं ? ऑम्लेट खाणार ? "... " नाहींतर काय पुरणपोळी करणार आहेस ? "... पु...र...ण...पो...ळी..." रघुनाथला किनई पुरणपोळी फार आवडते सूनबाई..."..." पण आई ! कशाला तूं हा त्रास घेते आहेस ! अग तूं आजारी आहेस, नाहीं का ? "..." अरे त्रास कसला त्यांत ? कधींतरी वर्षासहा महिन्यानीं माझा बाबा घरीं यायचा "...बा...बा... " बाबा, तुम्ही मुंबईला कां राहातां हो ? "..." कां म्हणजे नोकरी करण्यासाठीं मला मुंबईला रहावं लागतं "..."नोकरी कशाला करायची ? ".. "मग पैसे कसे मिळायचे ?"..." मग आण्णांना इथं पेन्शन मिळतं कीं ! तुम्ही कां नाहीं घेत पेन्शन ? आम्ही आपलं तुमची रोज वाट बघावी..."...

वा ट ब घा य ची...

" काल रात्रीं स्वारी यायची म्हणून माझ्या डोळ्याला डोळा लागला नाहीं "...

" साडेसहाला वेळ दिली होती तुम्ही मला आणि तासभर उशीरां उगवतां आहांत ? मी आज मुळीं तुमच्याशीं बोलणारच नाहीं !"

" पाहूं रे कीती वाट जिवलगा..." रघुनाथ गुणगुणूं लागला. टॅक्सी एम्पायर हॉटेलाच्या पोर्चमध्यें येऊन थडकली. दाराशीं घुटमळणारे एक-दोन चपराशी मोटार दिसतांच पुढें झाले. आणि दार उघडून सलाम करून उभे राहिले. रघुनाथ खालीं उतरला आणि टॅक्सीचें बिल भागवून होमीची चौकशी करूं लागला. तोंच—

"हॅलो डार्लींगसाहिब!" होमीचा आवाज आला. रघुनाथनें हॉटेलबाहेर प्रसन्न झगझगीत उद्यानांत एका कोपऱ्यांत नजर टाकली. उद्यानांत मोकळ्यावर रोषणाईचा थाट उडवून मंडळीचें हास्यविनोदांत भोजन चाललें होतें. तिथून रघुनाथला पाहून बाटलीवाला ओरडला. आणि भोजन अर्धवट टाकून रघुनाथकडे आपलें स्थूल पोट आंवरीत धांवला. रघुनाथचे डोळे भिरीभिरी मंडळींच्यावरून फिरले. पण त्याला मारी कुठंच दिसली नाहीं.

" आतां उगवतो आहेस तू ? " होमी त्याचे खादे गदगदा हलवीत खुषीत गुरगुरला—" रंगाचा बेरंग करणारा गद्धा आहेस तूं..."

" तें राहूं दे. मला आधीं सांग, मारी कुठाय ? "

" मला विचारतो आहेस आणखी ! तूं येत नाहींस असं कळल्यावर ती कशाला फिरतेय इकडे ? "

"म्हणजे ! मारी आलीच नाहीं ! "

" येत नाहीं म्हणून तिचा फोन आला. आम्हांला वाटलं तुम्ही दोघांनीं मिळून चाट मारलीत आम्हांला आणि... "

"म्हणजे गेली तरी कुठं ही पोरगी ! घरीं ! "

" जाऊं दे रे , व्हाय वरी ! ये इकडे. तुझ्या नवीन दोन पोरींच्या ओळखी करून देतों. जेवण व्हायचंय ना अजून तुझं ? "

" माफ कर मला, आज या वेळेला आग्रह करूं नकोस मला तूं. मारीला भेटलंच पाहिजे मला. "

" कांहीं रागवारागवी झालीय वाटतं ? खूप उल्लू के पठ्ठे आहांत झालं. थांब, थोडं खाऊन जा... "

" नो नो, आय मस्ट गो ! गुड नाइट ! "

होमी कांहीं प्रत्युत्तर करणार तेवढ्यांत रघुनाथ बाहेर पडला. आणि रस्ता ओलाडूं लागला. दोन चौक ओलांडून बस स्टॉपवर तो येऊन पोचला. बससाठीं उभी असलेली रांग पाहून त्याचें मन चिडचिड करीत उठलें. त्यानं आजुबाजूला पाहिलें, टॅक्सी नव्हती कीं व्हिक्टोरिया नव्हती. चडफडत रांगेमधल्या शेवटच्या माणसामागें जाऊन तो उभा राहिला

...—आतां घरीं देखील मारी नसली म्हणजे !.. चला बोर्डींगमध्यें खोलींत आडयाकडे पाहून दिवसावर रात्र उगाळायला...

नाहींतर खजीनदाराबरोबर अचकट विचकट गप्पा मारायला...

नाहींतर आणापॉईंटवर शेजारीं ब्रीज खेळायला...

आंबलेल्या गप्पा मन थकेतोंपर्यंत...

ब्रीजचा अड्डा डोकें शिणेतोंपर्यंत...

घोरासुराचें आख्यान डोळे मिटेतोंपर्यंत ..

सकाळ झाली कीं आहेच पुन्हा नऊ पस्तीसची लोकल...

रघुनाथच्या मागें-पांच मिनीटांत सात आठ दहा माणसांची रांग वाढत गेली. त्याच्या मागेंच एक गुजराथी जोडपें उभें होतें. त्यांची छोटी तीन वर्षांची एक गुटगुटीत मुलगी मोठी छान, तरतरीत आणि बाळसेदार होती. रांगेंतल्या प्रत्येक माणसानें माना मुरडून पुन्हा पुन्हा तिला न्याहाळावें अशी गोजिरवाणी होती. ती कसली रांगेंत उभी राहते ! दुडुदुडु इकडे तिकडे धांवून, रांगेंतली आपली जागा सांभाळणाऱ्या आईबापांना तिनें पुरे पुरे करून सोडलें. रघुनाथच्या हातांत आंगठी चमकत होती, ती त्या छोकरीनें पाहिली आणि युगायुगांची ओळख असावी तशी ती झटकन् त्याच्या जवळ येऊन त्याच्या हाताशीं

सलगी करूं लागली. रघुनाथनं तिच्याकडे पाहिलं. त्याला ती एकदम आवडली. तो प्रसन्नपणें हंसला. तीहि निष्पापपणें सहजगत्या त्याच्याकडे पाहून हंसली. आणि त्या दोघांची ओळख झाली. रघुनाथनें खालीं वांकून तिला उचलून घेतलें. आणि तो तिच्या बोबड्या भाषेंत तिच्याशीं लडिवाळपणें बोलूं लागला.–

...निमाहि अशीच गुटगुटीत नि गोजिरवाणी असेल...अशीच बंड झाली असेल...असेच खडीसाखरेसारखे लाडे लाडे चाळे...लाडे लाडे बोल...

चारशें मैल दूर. .चार सहा महिने दूर...

तिच्यासारखं बोबडं बोलून तो तिला खेळवूं लागला. तिला वाकोल्या दाखवून खदखदा हंसवू लागला. रांगेंतील आंबलेलीं माणसें ही बिन-पैशानें होणारी करमणूक माना मुरडून वांकून पाहूं लागलीं. आणि दिलखुलासपणें तींहि हंसूं लागलीं. मुलीच्या आईबापाना मूठभर मांस चढलें. थाळींतून पेपरमिंट विकणारा एक पोऱ्या आला. त्याकडून रघुनाथनें पेपरमिंट विकत घेतलें. आणि तिच्या छोट्या मुठी उदारपणें भरल्या. उरलेल्या गोळ्या खिशात टाकल्या. ती जास्तच लाघवीपणानें त्याला बिलगली. त्यानें मग खिशांतून रेशमी रुमाल बाहेर काढला आणि त्याचा उंदीर करून तिच्या हातांत दिला. ती खूप हंसली आणि तिनं उंदरावर उडी घालून तो पटकावला. तो देईनाच. मुलीच्या आईबापांनाहि कौतुक वाटलें आणि तेहि रघुनाथशीं हवापाण्यावर बोलूं लागले. इतक्यांत--

धाड् धाड् करीत बस आली. कंडक्टरनें रांगेंतील माणसें मोजून सोडूं लागला. रघुनाथ छोकरीला कडेवर घेऊन पुढें पुढें सरकत होता. तो दारांतून आंत चढला आणि कंडक्टरनें तो शेवटचाच नंबर म्हणून पुकारलें. रघुनाथनें त्या गुजराती जोडप्याबद्दल रदबदली केली, पण व्यर्थ. कंडक्टर

नियमांच्या हुकूमाचा ताबेदार. नाईलाजानें रघुनाथनें छोकरीला तिच्या आईच्या स्वाधीन केली. ती छोकरी तरी वस्ताद अशी कीं, आईकडे जातां जाईना. आईनें तिला बळानें ओढून घेतलें तर ती रडूं लागली. जाणाऱ्या बसकडे हात करून म्हणते--" टाटा ! टाटा ! " सशासारखे तिचे गोजीरवाणे डोळे भरून आलेले पाहून रघुनाथला पोटांत कालवल्या-सारखे झालें. डोळ्यासमोर अंधेरी आली. धडपडत ठेंचकाळत तो कसातरी बाकावर जाऊन आदळला.

पुन्हा बस धावूं लागली. रघुनाथनें धांवत्या बसमधून पुन्हा डोकावून नजरेला ताण देऊन पाहिलें. गोजीरवाणा बोबडा ससा हात उंचावून " टाटा, टाटा " करीत होता.

**बोबडा ससा उंचावूनी पंजा**
**अनोळख्या कोणा मुशाफीराला करतो –" टाटा ! "**
**कोण्या देशाचा, कोठल्या प्रान्ताचा रहिवासी हा ?**
**सत्ययुगांतील विश्वासानें या रांगेमधल्या फीरस्त्यालाहि**
**बिलगूनी यां करीतो 'आपुला'**
**सहवासानें क्षणभराच्या**
**उभवी इमला हिरव्या निळ्या नाज़ुक धाग्यांचा !**
**आणि आतां जेव्हां—**
**तटा..तटा..तटा..तुटले धागे जीवनांतल्या खेचाखेचीमधें,**
**कोसळे सशाचा स्वप्नाळू रंगीत ढगांचा इमला !**
**इमल्यांतल्या नाजूक विश्वाचा होतां चोळामोळा,**
**आक्रंदूं लागे दीनवाणा ससा !**
**रबरी रेशमी कापसाचे गाल**
**फुग्यासारखे फुगले भप्प.**
**रुसून रडून नाकाचाहि शेंडा जाहला लाल.**
**हंसरे भीतरे सशाचे डोळे**
**कोण्या जन्मीच्या आठवणीनें पाझरूं लागती**

मुशाफीराला जातांना पाहून
कधींहि न जो भेटायाचा वा दिसायाचा आतां
बोबड्या सशाला ?
सशाच्या ओठांत मायेचा परीस
आईनें दिला, पदराआडचें जीवन अर्पून !
ओठांचा परीस लागतां जराशी–
सुवर्णानंदानें उजळूं लागले रांगेमधले पोलादी पुतळे.
पाषाणालाहि फुटूं लागली आपुलकीची हिरवी पालवी.
सशानें गुंफील सहजतेनें
बोबड्या बोलांच्या लाळेनें आपुलें बिसतंतु जाळें !
आढ्यतेखोर पोलादी जंतूहि
बोबड्या बोलांच्या जाळ्यांत जाहले क्षणापुरते जीवनमुक्त !
सशाच्या जाळ्यांत जीवनशक्ति !
सशाच्या जाळ्यांत जीवनमुक्ति !
सशाच्या स्पर्शानें
भरून आलें धूसर अंबर.
पिवळ्या उन्हांत रुमझुमूं लागे नागवा पाऊस.
सप्तरंगामधें नाचूं लागलें
पश्चिमेस कोठें
विविध भावांचें इंद्रधनुष्य.
घरोघरींच्या महादेवांचे
हजारों कोपीष्ट तिसरे डोळे
भिजून निवाले सशाच्या दृष्टींत.
कोण्या देशाचा, कोठल्या प्रान्ताचा रहिवासी हा ?
बोबडा ससा उंचावूनी पंजा
अनोळख्या कोणा मुशाफीराला करतो–" टाटा "...

बस धांवत होती.
तें दीड मिनीटाचें वात्सल्य...तुडवून...तुडवून

त्यावर चुरलेली खडी आणि आंबलेली चिकट माया ओतून...
आणि भला मोठा अजस्र रूळ फिरवून...चापून...चोपून...
गुळगुळीत घासून घासून...
त्या गुळगुळीत रस्त्यावरून बस डौलांत धांवत होती.
रघुनाथनें उद्विग्नतेनें समोर पाहिलं. बसच्या आंतल्या बाजूला चारी कडांना वरच्या बाजूला निरनिराळ्या जाहिराती लटकलेल्या होत्या. त्याच्या समोरचीच जाहिरात म्हणत होती—
" दुसऱ्याचीं रेशनकार्डे वापरणें हा गुन्हा आहे. "
आणि त्याच्यापलीकडेच दुसरी जाहिरात ओरडून सांगत होती—
" कॉलरा प्रतिबंधक लस टोंचून घ्या...
०००...दुसऱ्याच्या मुलांच्यावर माया करणें हा गुन्हा आहे...
...वात्सल्य—प्रतिबंधक लस टोंचून घ्या...
..'परस्त्रीवर प्रेम करणें हा गुन्हा आहे...
...प्रणय—प्रतिबंधक लस टोंचून घ्या...
...लस...ल...स...डॉ...क्ट...र...
" डॉक्टर आहेत का ? "
"या, मीच डॉक्टर...काय काम आहे ? मुद्रेवरून तर आजारी दिसतां खरें ना ? "
" तुम्ही तयार केलेली लस टोंचून घ्यायला आलोंय मी. "
" असं होय ! कोणती लस घेणार टोंचून ? प्रणय—प्रतिबंधक कीं वात्सल्य-प्रतिबंधक ? "
" दोन्ही प्रकार टाका टोंचून मला. "
" बायको मुलं घरदार कुठं आहे तुमचें ? "
" कोंकणांत. चारशें मैल दूर. "
" किती दिवसांनीं जातां घरीं ? हो, म्हणजे त्या मानानें डोस तयार

करायला हवा. बोलून चालून लसच ती. आपण डोस तयार करावा या मानानें परिणाम टिकायचा.

" एकदां टोंचून घेतली तुमची लस, म्हणजे किती दिवस बायका-मुलांची आणि घरादाराची आठवण येत नाहीं माणसाला ? "

" तेंच सांगितलं ना, लस तयार करण्यावर अवलंबून आहे तें. परवांच एका निर्वासितांच्या जथ्याला टोंचलं मीं, त्यामुळं तर त्यांना जन्मभर घरादाराची याद येणार नाहीं...

" नको नको, मला फक्त सहा महिने पुरेल इतका... "

" ठीक आहे, आपण काय, फक्त सहा महिने परिणाम टिकेल असाच डोस तयार करूं म्हणजे झालं...

"एकदां टोंचून घेतलं म्हणजे सहा महिने अगदीं बघायला नको ना?"

"त्याची काळजीच सोडा तुम्ही. युद्धकालापासून दवाखाना घातला आहे मी. माझ्या पेशंटना विचाराना एकदां..हं. या इकडे..
या पूर्वी केव्हां लस टोंचून घेतली होती तुम्ही ? "

"पहिलीच वेळ आहे माझी ही.."

"काय पहिलीच ? मुंबईत नवीन आलेले दिसताय तुम्ही ?"

"आठ वर्षें आहे मी इथें.. "

आठ वर्षें ! माय गॉड! घरादाराशिवाय ? खरंच? यू आर
रिअली ए वंडरफुल केस...
वं..ड..र..फु .ल..ब्यु..टी..फु..ल..
मा..री..–

गचकन् गचका बसून बस उभी राहिली. रघुनाथ ठेचकाळत खालीं उतरला. रस्ता ओलांडून तुरळक वस्तीच्या एका आड रस्त्यावरून तो झपझप निघाला. विजेच्या रोषणाईचा झगमगाट संपला होता. स्वच्छ

चंद्रप्रकाशांत उजळलेला डांबरी रस्ता तुडवत तो चालला होता. टोलेजंग इमारती मागें पडल्या आणि बसक्या बंगल्यांची रांग सुरू झाली.

पलीकडच्या रेडचर्चला वळसा घातला कीं मारीच्या बंगल्याचें फाटक...

फाटक उघडून पायऱ्या उतरून खालीं बगीच्यांत...

बगीच्यांतून पोर्चमधें...पोर्चमधून दारावरील घंटेची कळ...

पावलांचा आवाज .."अय्या, कोण ? रघुनाथ ? तुम्ही आलांत ?"

"वेडी, तुला काय वाटलं, मी खरंच गांवीं गेलों म्हणून ? तुझी आपली मी गम्मत केली...आणि..."

..."कांहीं इकडं तिकडं बघूं नका. घरांत कोणीसुद्धां नाहीं. अगदीं तुम्ही आणि मी. मला तुमच्याशीं कित्ती कित्ती बोलायचं..."

"हो हो, पण मला कपडे तर बदलूं देशील ना ?..."

...किस्मत हमारे साथ है...

रघुनाथ रेडचर्चला वळसा घालून आला आणि मारीचा बंगला त्याच्या दृष्टिपथांत येतांच—

बंगल्यांत दिवे तर लागलेले खिडक्यांच्या उजळलेल्या तावदानावरून दिसताहेत. मारी नक्कीच घरीं आहे. आतां काय ?... जलनेवाले जला करे...

अधीरतेनें पावलं उचलीत तो फाटकापाशीं आला. एकदम त्यानं फाटकाच्या कडीला हात घातला. आणि—कदाचित तो लाडीकपणें ओरडलाहि असता "—माऽरीऽ—!"

पण त्याची नजर सहज समोरच्या उद्यानांत गेली. आणि तो एकदम चपापला ! थबकला ! घाबरा झाला ! तेथल्या तेथें थिजला !

खालीं बागेंत हौदाजवळ चांदण्यांत मारी उभी होती. पण ती एकटी

नव्हती. कुण्या सडसडीत उंच तरुणानें प्रणयचेष्टा करतांना तिला जबरदस्तीनें आपल्या बाहुपाशांत गोळा केली होती.

रघुनाथचे ओठ थरथरूं लागले. आंगाला नखशिखांत घाम सुटला. घशाला कोरड पडली. सारें विश्व उलटें पालटें होत आहे, असें त्याला वाटलें. लाचार नजरेनें तो तें दृश्य पाहूं लागला.

हळू हळू तिचे हातहि त्या तरुणाच्या गळ्याभोंवतीं पडले. घट्ट–घट्ट होऊं लागले. आणि त्यानं तिचं प्रदीर्घ चुंबन घेतलं.

एकदां, दोनदां, तीनदां,...आणि मग दगामस्ती करीत ती त्याच्या बाहुपाशांतून निसटली. आणि–" डाऽऽलींग ! डाऽऽलींग ! " असें लडिवाळपणें त्या तरुणाला आव्हानीत ती पोर्चमधून आंत बंगल्यांत पळाली. पाठोपाठ तो तरुणहि कामातुर झाल्याप्रमाणें लंपटपणें धांवत तिचा पाठ-लाग करीत तिच्या मागोमाग आंत गेला. जातां जातां त्यानं दार लावून घेतलं. आणि बोल्ट सरकावला. रघुनाथनें तो बोल्ट ऐकला आणि —

...रसरसून उद्रेक होऊन उसळलेला लाव्हा रस भूगर्भालाच बेचिराख करीत आंत आंत जाऊं लागला. आकाशांतले काळेकभिन्न ढग एक-मेकांवर अंधारात फुत्कार सोडूं लागले, नरभक्ष मिळालेल्या अजगरानें प्रचंड झाडाला वेटोळीं घालून तीं आवळत आंतलीं हाडें कडकडा फोडण्याला आरंभ केला. मातीच्या ढिपळातून डोकावणारीं असंख्य इवलीं गवताचीं पातीं आंतल्या आंत मुसमुसूं लागलीं. हिरव्यागार पानांनीं डवरलेलें प्रचंड अरण्य बघतां बघतां सुकून पिवळें फटफटीत पडलें. सुकलेलीं पानें झंजावाताबरोबर सळसळत वाट फुटेल तिकडे पळूं लागलीं. आणि नुसते झाडांचे प्रचंड खराटे डोलावूं लागले...

त्याला आणि तिला...!

नको, तिला एकटीलाच...

गळा दाबून दाबून...

भट्टींत घालून भाजून भाजून...
प्रचंड रोलरखालीं चिरडून चिरडून...घूस...काळी घूस...
निस्तेज डोळे...निळे डोळे...इंदुमती...
मला इंदुमती हवी आहे...मला इंदुमती हवी आहे.
...शिल्लक नाहीं...
मग मला गौरी हवी आहे...
...मिळायची नाहीं...बाईमाणूस पाहून गमजा करूं नका. मार खाल.
म...रा...ल...शरीर तासलें जाऊन हाडांचा सांपळा तेवढा जाईल रुग्णालयांतील प्रयोगशाळा सजवायला...
मला मारी हवी आहे...
आतां शक्य नाहीं. मघाशीं कां नाहीं घेतलींत ? आतां माल खपला. त्यावेळीं तुम्हांला घरच्या मायाममतेची झिंग चढली होती ना ?
दुसरा माल दाखवूं ? दुसऱ्या मुलींच्या ओळखी करून देऊं ?
...शरीर म्हणजे काय बाजार आहे ?
...नुसतें शरीरच कां ? मन देखील...

—०— —०— —०—

इंदुमती नाहीं तर गौरी...
गौरी नाहीं तर मारी...
मारी नाहीं तर आणखी कोणीतरी...
दाम रोख तर माल चोख...
संतापानं जळफळत रघुनाथनं बंगल्याकडे पाठ फिरवली आणि तो दिसेल त्या रस्त्यानें वेडगळासारखा चालूं लागला.
इंदुमती नाहीं तर गौरी...
गौरी नाहीं तर मारी...

मारी नाहीं तर आणखी कोणी तरी...

फ...टा..क...डी...दाम रोख तर मा...ल...चो...ख...,

गल्लीमागून गल्ली, रस्त्यामागून रस्ते, चौकामागून चौक ओलांडत रघुनाथ चालला होता. झोंपेंत चालणारा माणूस चालतो त्याप्रमाणें! गारठलेल्या संवेदनांनीं ! ट्रॅम्स येत होत्या, जात होत्या. चौचाकी गाड्या रखडत होत्या. मोटारी आडवे उभे फराटे मारीत धांवत होत्या. माणसें धक्काबुक्की करीत घाईनें जात येत होतीं.

बंदुकीच्या गोळीनें घायाळ झालेल्या कुत्र्यानें रस्त्यावर रक्ताचें थारोळें सांचवीत फरफटत जावें तसा रघुनाथ रेंगाळत ठेंचकाळत चालला होता.

कपड्यावरील अत्तराचा गंध फिदीफिदी हंसतोय...

चकचकीत बुटावरील पॉलीस फिदीफिदी हंसतेय...

चापचोपून बसवलेले आणि आतां पिंजारलेले केस फिदीफिदी हंसताहेत.

गाडी घोडे, मोटारी, विजेची रोषणाई, उंच उंच इमले नि त्यावर लुकलुकणाऱ्या खिडक्या फिदीफिदी हंसताहेत...

हंसून म्हणतात–जलनेवाले जला करे...

" अहो मिस्टर, जरा समोर बघून चाला कीं ? खुशाल दुसऱ्यांच्या बायकांना धक्के मारून चाललां आहांत...! "

रघुनाथ दचकून भानावर आला. सुटाबुटांतला एक संभावीत कुणा देखण्या तरुणीला घेऊन चालला होता. तंद्रींत चाललेल्या रघुनाथाचा बाईला धक्का लागतांच ती अस्फुट किंचाळली आणि तिचे श्रीयुत रघुनाथवर खेंकसले. रघुनाथ एकदम भडकला आणि भांडणतंटा करण्यासाठीं तो मागें वळला. पण काय झालें तें त्याच्या डोक्यांत प्रकाशण्यापूर्वींच तीं दोघें दृष्टीपार झालीं होतीं.

ऐटींत जातोय मोठ्या...पायांत छत्री घालून ओढून सपशेल उताणा

आपटला पाहिजे तेव्हां समजेल...जशी कांहीं मुलखावेगळी या साहे-बांनाच बायको मिळाली आहे...घर मिळालंय राहायला म्हणून बाय-कोला मिरवून घेतोय बरोबर...एकटा हिंडून या मुंबईत मरून पहा म्हणावं... बायको बसेल जन्मभर वाट पहात आणि तूं जाशील बेवारशी ठरून रुग्णालयांतील प्रयोगशाळेंत सांगाड्याच्या प्रदर्शनांत भर घालायला...

..." कृष्णा माझा पदर धरूं नको सोड..."

पलीकडच्या देवळातल्या सभामंडपांत विजेच्या झगझमाटांत बाया-बापड्यांची गर्दी जमली होती. म्हातारेकोतारेहि खूप दाटीदाटीनें बसले होते. मारे पुढची जागा पकडून आणि रंगांत येऊन हरदासबुवा एक-नाथाची गौळण गात होते. सभामंडपाशीं येऊन गर्दीच्या मागें उभें राहून टाचा उंचावून त्यानं हरदासबुवांची सुरत न्याहाळली. साठ वर्षांचा म्हातारा, पण कसा लालबुंद तुकतुकीत दिसत होता डोळे भुंवया उडवून, खांकरून खोकून कसा मजेदारपणें मिस्कीलपणें बोलत होता. गाणें संपवून कथाभाग पुढें चालवीत तो म्हणत होता, " तेव्हा जेहत्ते कालाच्या ठायीं साक्षात भगवंतानीं, विश्वरूप धारण करणाऱ्या परमा-त्म्यांनीं, आणि महाराज सायंकाळच्या वेळीं चद्रप्रकाशांत यमुनेच्या कांठीं गोकुळांतल्या गोपींच्या बरोबर रासक्रीडा आरंभिली. नदीकांठीं वस्त्रें ठेवून घडीभर निश्चितपणें जलाशयांत क्रीडा करण्यासाठीं उतर-लेल्या गोपींना फसवून भगवंतांनीं त्यांचीं वस्त्रें झाडावर लपविलीं आणि...

रघुनाथचे डोळे जळजळायला लागले. सर्वांगाला ठणका लागला. आणि गर्दी सोडून त्यानं पुन्हां फूटपाथचा मार्ग धरला. एका भव्य चित्रपटगृहावरून तो जाऊं लागला. चित्रपटगृहाच्या प्रशस्त झगझगीत आवारांत स्त्रीपुरुषांची खेचाखेच झाली होती. तिकीटाच्या दाराशीं एक लांबलचक रांग लागली होती. रघुनाथचे पाय न कळत घोटाळले. आवा-रांतल्या स्त्रीपुरुषांचा अमर्याद उत्साह तो अनिमिष नेत्रांनीं पाहूं लागला.

प्रत्येकाच्या मुखावर आनंद उल्हास कसा थुईथुई उसळत होता. स्त्रीपुरुष गटागटानें हास्यविनोदाचे फवारे उडवत आबारांत जात होते आणि तिकीटें हातीं पडताच आंत शिरत होते....कोणाचे मित्र मैत्रिणी...

कोणाचे भाऊ बहिणी...

कोणाचे आईबाप...

कोणाची प्रेयसी, कोणाची लाडकी पत्नी...

आणि आपण ? एकटे उभे राहिलों आहोंत बुभुक्षित डोळ्यांचें पारणें फेडीत...घर आठवतां म...न...डु...च...म...ळें--

" धांवा...धांवा...धांवा..." पलीकडच्या एका गल्लींतून एकदम मोठा गलका ऐकूं आला. रघुनाथ घाईनें काय झालें तें बघण्यासाठीं तिकडे धांवला. " मारा...ठोका...चेचा...साल्याला...बाईची अब्रू घेतो..." गर्दीचा प्रचंड लोंढा आरडाओरड करीत गल्लींतून बाहेर पडला. रघुनाथ लगबगीनें गर्दींत घुसून पाहूं लागला. आणि जमलेल्या माण-सांना बाजूला सारीत चौकशी करूं लागला.

एक निग्रो सैनिक रक्तबंबाळ होऊन अस्ताव्यस्त पसरला होता ? आणि एक सतरा अठरा वर्षांची अल्लड रूपवती तरुणी घाबरून उमसून रडत गर्दींत बाजूला उभी होती. भोंवतालचे पराक्रमी बघे सुरसुरून शिव्या-गाळी करीत तिचा कैवार घेऊन त्या निग्रो सैनिकाला लाथाबुक्क्यांनीं झोडपत होते.

पलीकडच्या गल्लींतून ती तरुणी रात्रीची एकटीच येत आहे असें पाहून या रस्त्यावर घोटाळणाऱ्या निग्रो सैनिकानें तिचा विनयभंग केला. त्याचें प्रायश्चित...

—विनयभंग म्हणजे...तिला जबरदस्तीनें बाहुपाशांत घेतली...तिचीं चुंबनें घेतलीं...

त्या पाठमोऱ्या तरुणानें जसें मारीला कवटाळलें तस्सेंच...—त्या गर्दीत रघुनाथ एकटाच काय तो सभ्य पोशाखांतला ' जंटलमन ' होता. बाकी सारे पानपट्टीवाले आणि हॉटेलमधले कपबशीवालेच ! रघुनाथला पाहतांच ती भेदरलेली अल्लड कुमारिका, अनोळखीपणा विसरून त्याला बिलगली. रघुनाथनं तिच्या पाठीवरून हात फिरवीत तिची समजूत घातली. त्यानें असहाय निग्रोवर तुटून पडलेल्या नीतिरक्षकांचें निवारण केलें. आणि एकंदर प्रकरणाची तो पुढाकार घेऊन निरवानिरव करूं लागला. तितक्यांत पोलीस उगवले; आणि सहाजिकच बघे पळाले. जखमी निग्रोला पोलीसानें ताब्यांत घेतलें आणि त्याची इस्पितळात सुरक्षितपणें रवानगी केली. नंतर रघुनाथकडून मामुली नोंदी करून घेतां घेतां त्यानें विचारलें—

" या बाई तुमच्या पत्नी वाटतं ! "

रघुनाथला एकदम असंख्य गुदगुल्या झाल्या. पण त्या तरुणीच्या मुखाकडे पहातांच तो एकदम गांगरून गेला. तो चांचरत म्हणाला—

" छे, छे या माझ्या..."

ती तरुणी प्रसन्नपणें हसली आणि म्हणाली— "माझे भाऊ आहेत हे."

पोलीसानें एकदां रोखून दोघाकडे पाहिलें आणि पुन्हा तो नोंद करून घेऊं लागला.

रघुनाथ एकाएकी शरमिंदा झाला. कुठेंतरी आंत कांहीं तरी दुखावलें. आणि त्याच्या कळा त्याला सहन होईनात. त्यानें तिच्या मुखावरील अल्लडपणा आणि निष्पापपणा पाहिला आणि त्याची त्यालाच लाज वाटूं लागली. पसंग टळला. तिला घरीं पोंचविण्याची जबाबदारी रघुनाथवर सोंपवून पोलीस चालता झाला.

रघुनाथनं म्हटलं—" हं ! चला आतां घर दाखवा मला तुमचं. तुम्हाला घरीं पोंचवून जायला हवं मला. " पण तेवढ्यांत त्यानं तिची

मुद्रा न्याहाळली. ती थकून गेली होती. घामानं डबडबली होती. त्यानं तिला मायेनं म्हटलं–" या समोरच्या हॉटेलमध्यें कॉफी घेतली तर कांहीं हरकत आहे का तुमची ? तेवढीच तुम्हाला हुषारी येईल ! "

" चला, माझी हरकत नाहीं कांहीं. "

तिला घेऊन रघुनाथ कॉफी हौसमध्यें गेला. एका टेबलावर समोरा-समोर बसून त्यांचें कॉफीपान सुरू झालें. पोलीस गेल्यापासून तिच्या तोंडाची जी टकळी सुरू झाली होती ती कॉफीपान संपेपर्यंत. तिनें आपल्यावर हा प्रसंग कसा ओढवला तें समग्र वर्णन करून सांगितलें. आणि सांगतां सांगतां तिनें पुन्हा एकदा रडून ( आणि रघुनाथकडून समजावणी करून ) घेतलें. तिच्या मैत्रिणीचा वाढदिवस होता म्हणून घरीं जायला तिला इतका उशीर झाला. त्या उत्सवांत ती इतकी रमली होती कीं रात्र झाल्याचें तिच्या लक्षांतच आलें नाहीं. आणि भानावर येतांच घरीं आईवडील रागावतील म्हणून तिनें हा जवळचा आडमार्ग स्वीकारला. तों आडवळणावरच कोणी चांडाळानें तिच्यावर झडप घातली आणि...

त्याचें लक्ष होतें कोठें ती काय सांगते त्याकडे ! आपण दोघें एका टेबलावर बसलेले पाहून किती बुभुक्षित संभावितांचे चोरटे डोळे आपल्यावर खिळले आहेत हें तो न्याहाळत होता.–

–हे सारे बुभुक्षित डोळे निर्वीष असले तरी त्या निग्रोप्रमाणेंच मवाली आहेत ! प्रत्येक नजर म्हणते.. " चैन आहे बुवा "..

प्रत्येक निग्रोनजर सांगते–.. ' आतां काय रात्र आपलीच '...

प्रत्येकाच्या डोळ्यांत पापण्याआड एकएक निग्रो लपला आहे...वरून मारे दाढी घोटघोटून झिलाई आणली आहे चेहऱ्याला, पण डॉक्टर-कडे जाऊन डोकें खोलून किती जळमटें सांचलीं आहेत तें पहा. विमलचा नवरा म्हणतो तेंच खरें...

My dear friend, the word 'Gentleman' in 20th century means 'Impotence', and not 'Innocence....!

नपूंसकता...निरागसता...

जमलेले सारे संभावित निष्पाप नव्हेत,तर न..पूं..स..क सं..भा..वि..त

आणि महाराज आपण कोण ? विश्वामित्र महाराज आपण कोण ?–

रघुनाथच्यासमोर ती तरुणी बसली होती. तिच्या पाठीशीं प्रचंड आरसे उभे होते. त्यांतून रघुनाथ आपल्यामागें बसलेल्या संभावितांचे चेहरे न्याहाळीत होता. एकाएकीं तो दचकला.—

त्याच्यामागेंच पंधरा फुटावर दोन पारशी तरुण बसले होते, त्यापैकीं एका मिस्कील तरुणानें समोरच्या तरुणीकडे आपली बुभुक्षित नजर लावून आपला एक डोळा मिचकावला. रघुनाथनें तें आरशांतून पाहिलें. तिनेंहि तें पाहिलें असावें. कारण ती एकदम गोरीमोरी झाली. रघुनाथचें सभ्य रक्त आणि त्या रक्तांतील स्त्रीदाक्षिण्य चिडचिडत उसळलें. आणि कांहीं भांडणतंटा करण्यासाठीं तो उठणार होता. पण तेवढ्यांत त्या तरुणीनें त्याला आवरलें. ती म्हणाली कीं या भागांत असेच मवाली हिंडत असतात. त्यांच्या का नादी लागायचें !

...नक्की कोणाला उद्देशून म्हणाली हें ही बया ?

आपल्याला कीं या आसपासच्या संभावितांना ?...

प्रत्येक संभावितांच्या बुबुळांत लपलेला मवाली पापण्यांच्या पडद्यांनीं काय पण सफाईनें झाकून टाकला आहे. कोणाला संशय देखील यायचा नाहीं...एकेकाच्या पापण्यावर सभ्यतेची आणि सौजन्याची, स्त्रीदाक्षिण्याची आणि सुसंस्कृततेची कारागिरानीं लेणीं खोदलीं आहेत लेणीं... रस्त्याच्या कडेला एकाद्या पानपट्टीच्या दुकानांत एकादा लक्तरें आंगावर असलेला, अचकट विचकट बोलणारा मवाली खिदळतांना दिसला कीं संभावितांच्या डोळ्यांत अंगार उसळतो...हात फुरफुरूं लागतात, आणि

क्रोधाचे शब्द ओठावर फोडणीप्रमाणें नाचूं लागतात...पण हाच संभावीत कधींकाळीं एकटाच अनोळखी रस्त्यानें जायला लागूं द्या. आणि समोरून एखादी रूपवती स्त्री अधोवदनानें चालली आहे...मागें आणि पुढें अंकुश टोचायला दुसरा कोणीहि संभावीत नाहीं‥तावडतोब सरकाफरसे खेचल्याप्रमाणें या कोरीव लेण्याच्या पापण्या मागें खाचेंत खेचल्या जातील आणि आणि बुबुळांतला मवाली अधाशी नजरेनें, मागें माना मुरडून मर्कटचेष्टा करूं लागेल.. अशी आहे ही संभावितांची दुनिया. आपणहि त्यातलेंच एक...

म्हणून तर ही छोकरी असे बोलली नाहीं ना? आणि अशा विचित्र नजरेनें म्हणूनच तर तिनें पाहिलें नाहीं ना? ...

छे छे, किती विश्वासानें, निष्पापपणें पहाते आहे ही आपल्याकडे.

मघाची ती नजर त्या संभावीत मवाल्यासाठीं...

आपल्यासाठीं ही गोड निष्पाप मायाळू दृष्टि...--

रघुनाथ दचकून भानावर आला. ती तरुणी पैसे देण्यासाठीं पर्स उघडीत होती. तेवढ्यांत रघुनाथनें गडबडीनें तिला अडवून स्वतः बिल चुकतें केलें आणि ती दोघें बाहेर पडली. रस्त्यानें चालतांना तिच्या तोंडाची टकळी सारखी चालू होती. रघुनाथ घुम्यासारखा नुसता ऐकत होता. त्याला वाटलें कीं हिच्या तोंडाला कोणी टाळा ठोकला तर बरें होईल.

तिच्या घरांत पाऊल टाकतांच तिच्या आई-वडिलांनीं, भावंडांनीं आप्तेष्टांनीं सुटकेचे निःश्वास टाकले. ते सर्व काळजींतच होते. शोधाशोध सुरू झाली होती, तेवढ्यांत रघुनाथ तिला घेऊन येऊन पोंचला. तिनें पुन्हां एकदां रडत रडत आपल्यावरील प्रसंग घरांतील मंडळींना कथन केला. आणि रघुनाथचा पराक्रम वर्णन करून सांगितला. तिच्या

आई-बापांनीं, भावंडांनीं, आप्तेष्टांनीं त्याचें कौतुक केलें. आदर दाखवला....

...पण यांतलें आपण काय केलें? बघ्यांच्या गर्दीत आपण घुसलों आणि नकळत नाइलाजानें आपल्याला सारें निस्तरावें लागलें. ही छोकरी म्हणते-आपण तिथें होतों म्हणून त्या प्रसंगांतून ती निभावली. नाहींतर... नाहींतर काय? रघुनाथच्या ऐवजीं दुसरा कोणी...दुसरा कोणी...दाम रोख तर माल चोख...-

तो सत्कार रघुनाथाला खुपूं लागला. मोठ्या कष्टानें निरोप घेऊन त्या अनोळखी घरांतून तो उठला. ती तरुणी निरोप देण्यासाठी जिन्यां-पर्यंत पुढें आली आणि अल्लडपणें हंसून म्हणते-

"माझं नांव नाहीं विचारलंत? मग ओळख कशी ठेवणार!"

"सांगा इच्छा असली तर."

"अनुराधा."

तेवढ्यांत घरांतील इतर मंडळीही तिथें आली आणि तिचे शब्द ओठांतच विरले. त्या मंडळींनीं रघुनाथाचे पुनःपुन्हां उपकार मानले पण त्याला त्यांपैकीं कांहींच नको होते. चिडचिडत तो एकटाच बाहेर पडला. आणि नाकासमोरच्या रस्त्यानें झपझप जाऊं लागला.

एकटा...एकटा...एकटा...

चोर...बदमाश...ढोंगी लेकाचे...तुमचे उपकार कसे मानावे?

...कसे मानावे?...द्या मला तुमची अनुराधा...संकटाच्या वेळीं कशी विश्वासानं बिलगली होती मला ...मी संकटाच्या वेळीं कुणाला बिलगूं?......

...खरंच बाई, तुम्ही होतास म्हणून मी सहिसलामत सुटलें. नाहींतर त्या चांडाळानें माझी काय विटंबना मांडली असती कोण जाणे ...खरंच, तुमचे उपकार कसे मानूं मी?...

...छे छे यात उपकाराचा काय प्रश्न ? माझं कर्तव्यच केलं मीं...

ढोंग...ढोंग...ढोंग !

उपकार कसे मानूं मी ?

एक गोऽड चुंबन देऊन...

...चुंबन ? धांवा...धांवा...

...मारा, ठोका, चेचा साल्याला...दिसतोय चागला संभावीत...आणि सभ्य कुमारिकेला चुंबन मागतोय..मिस्टर नांव काय तुमचं ?

...अरे हा तर मगाचा निग्रो सैनिक...पकडा पकडा...

...निग्रो कोण ? मी ? छे छे, अहो मी आपला रघुनाथ...

...बघातरी एकदां आपलें रूप...तो रक्ताळलेला सैनिकी पोशाख...ते बटबटीत डोळे..ते जाड चरबट ओठ..

अरे हा मी नव्हे...हा मी नव्हे...

असें सारेच म्हणतात...रणांगणावरून पळून येऊन इथें हे धंदे करता होय ?...

रणागणावरून पळून ?...मी कधीं रणांगणावर गेलों होतों ?...अहो तो होमी बाटलीवाला...बर्माच्या लढाईतून पळून आला होता.आतां मोठा ब्लॉक आर्टिस्ट झालाय. पण ब्रह्मदेशांत खूप गमती जमती केल्यात स्वारीनें. एका ब्रह्मी तरुणीवर अत्याचारदेखील केलाय त्यानें. विचारलं तर अशी रसभरीतपणानें सांगतो ती हकीकत. आंगावर आपल्या शहारे येतात. पण त्याला अजून मौज वाटते सांगतांनादेखील.....

थकून गेलेला रघुनाथ एका ट्रॅमच्या नाक्यावर आला आणि तिथं रेंगाळत उभा राहून तो ट्रॅमची वाट पाहूं लागला. पलीकडे पानपट्टीच्या दुकानांत काहीं मवाली खदखदत होते. आणि चंगीभंगी पोषाख केलेले लोक आकाशाकडे चोरटी नजर टाकीत रेंगाळत हिंडत होते....

...आकाशाकडे चोरटी नजर...,हे असें वर काय पाहतात ? कोणाला

खुणावतात ?...चमचमणाऱ्या तारकांना?...अमरावतींतील अप्सरांना...

रघुनाथनेंहि मान मुरडून वर पाहिलं. आणि...

...या तर खिडकींत नटून थटून बसलेल्या अप्सरा...

पुण्य करावें, अप्सरा लाटावी...सत्ययुगांतला कायदा...

पैसे मोजावे, अप्सरा उचलावी...कलीयुगांतला कायदा...

मला इंदुमती हवीय...शिल्लक नाहीं.

मला गौरी हवीय...मिळणार नाहीं.

मला मारी हवीय...मगाशीं कां नाहीं घेतलीस ? आतां माल खपला

दुसरा माल दाखवूं ? दुसऱ्या मुलींच्या ओळखी करून देऊं ? दुसरी कोण ! अनुराधा ! ती चालेल पण ..

तुम्हाला खूप चालेल हो...पण तिला चाललं पाहिजे ना ? कुलीन घराण्यांतील छोकरी आहे ती. पुढल्या वर्षीं लग्न व्हायचंय तिचं. आपल्या सारखं बेवारशी जीवित जगायला जन्माला आली नाहीं ती. आणि महाराज आपली मानलेली बहीण आहे नव्हे काय ती ? ...... असे शरमिंदे होऊं नका. तुमच्यासारख्या आंबलेल्या माणसांचीच सोय आहे ही... लग्नाच्या बाजारांत मिळणार नाहीं असा माल इथल्या बाजारांत मिळेल तुम्हांला. खिशांत भरपूर...

प्रेम नव्हे हं, पैसे असले कीं सणंगाला काय तोटा ? आज खास गोव्याहून नवीन माल आलाय तो तर पाहा...

...गो...व्या...हू...न...

रसरशीत यौवनानं मुसमुसलेल्या लावण्यलतिका...फार तर पंधरा सोळा वर्षांच्या...

पण मला नुसतं शरीर नकोय. मन हवंय, प्रेम हवंय...

प्रेम ? मुलखावेगळेच आहांत. घरोघर साखरेचीं पोतीं वाटलीं तर नको का म्हणणार आहे ? प्रेम गेलंय काळ्या बाजारांत...सरकारमे.

नियंत्रण बसवलंय ना ? अहो, मायेचा आपुलकीचा शब्ददेखील दुर्मिळ झालाय आजकाल...सरकारनेंच मायाममतेच्या कोठारांना पोलादी कुलपं ठोकलीं आहेत ना ?...

आणि तुमच्यासारख्या पांढरपेशांना काळ्या बाजारांतलं प्रेम परवडणार नाहीं...सध्या असं करा...नुसतं शरीर तर घेवून चला ..

परदेशांतून प्रेमाचा म्हणा...मायेचा म्हणा...निदान अनुकंपेचा तरी नक्कीच, नवीन सांठा येतांच बघूं या एकादा सणंग तुम्हाला देतां येतोय का तें...

पण माझ्या प्रेमाचीं, मायेचीं माणसं कोंकणांत आहेत...

कोंकणांत ? लंकेंत सोन्याच्या विटा...खेड्यांत शेंकडों प्रचंड वाडे रिकामे पडले आहेत. इथं मुंबईत आहे का कांहीं त्यांचा उपयोग ! तसंच आहे हें...

पण प्रेमाशिवाय शरीर म्हणजे...

साखरेशिवाय चहा. होय ना ? तुम्ही म्हणजे बुवा फारच...

अजून या शहरी संस्कृतीला सरावला नाहींत तुम्ही. युद्धापूर्वींचा काळ संपला मेहेरबान...आतां " युगें अठ्ठावीस विटेवरी तिष्ठत " उभे राहिलांत तरी तो काळ पुन्हां यायचा नाहीं. आठ वर्षे या मुंबईत एकटे खानावळींत राहिलाय म्हणताय, आणि हे " माया, ममता, प्रेम " शब्द तुमच्या जिभेवरून अजून कसे धुवून गेले नाहींत !

तल्लफ आली असली तर घाला चहांत गूळ नि प्या आंबट चेहरा करीत. कोण काय करणार ? आजचा जमानाच तसा आहे...

..." प्रेम लाभे प्रेमळाला, त्याग त्याची ही कसोटी "...

...काळ बदललाय महाराज...प्रेमासाठीं आतां त्याग करावा लागत नाहीं...तुम्हाला प्रेमाचे, मायेचे, आपुलकीचे शब्द ऐकायचे आहेत काय ?...मग पाहा गंमत करून...हिरव्या निळ्या नोटांनीं खिसे ग

भरा आणि तोंडदेखल्या दंतपंक्ति विचकणाऱ्या दोस्तापासून सदोदित कुठला तरी फंड काढणाऱ्या देशभक्तापर्यंत सढळ हातानें खैरात करीत चला...पहा तर चमत्कार...ही हिरवी निळी माया जवळ आहे तों पर्यंतच हं...

...असे गोड शब्द ऐकायला मिळतील...मऊ मऊ भावनांच्या पायघड्यावरून चालायला मिळेल...कल्पनेच्या एयर कंडीशन्ड कोचमधून मिरवले जाल महाराज! आहांत कुठं...अशा आहेत या 'कल्चर्ड' भावना...अस्सल हव्या आहेत कोणाला ?...

म्हणून म्हणतों...तल्लफ आलीय तर सध्या नुसतें शरीर घेऊन चला ...पैसे आहेत खुळखुळत खिशांत म्हणून सांगतों...

रघुनाथ दचकला त्याच्या पाठीवर कोणीतरी थाप मारली, आणि ओरडले-" भले रघुनाथराव..." चमकून त्यानं वळून पाहिलं. प्रेसमॅनेजर रेवाशंकर उभा होता.

" कोण रेवाशंकर तुम्ही इथं कसे ? पार्टी आटोपली इतक्यांत ? "

" मी इथं कसा ? म्हणजे हा प्रश्न मीं तुम्हाला विचारायचा कीं तुम्ही मला ? मी इथला नेहमींचाच फिरस्ता आहें. पण तुम्ही इथं कसे ? कोंकणांत गेला होतां ना तुम्ही ? कीं इथं होतं तुमचं कोंकण ? "

रघुनाथ गडबडून गोंधळून गेला. तुटक्या शब्दांत, मोडक्या भाषेंत चांचरत त्या रस्त्यावरील आपल्या उपस्थितीचें तो समर्थन करूं लागला. रेवाशंकर कसला वस्ताद,–सारें कांहीं ऐकून तो म्हणतो—

" तें आलं माझ्या लक्षांत. पण आम्ही तुम्हांला अगदीं 'कार्तिक स्वामी' ठरवून मोकळे झालों होतों, त्याला मात्र छान धक्का दिलात हं ! एकूण तुम्ही देखील आमच्यांतलेच तर..."

रघुनाथ एकदम उसळला. आणि तणतणून शिरा ताणून तो अद्वातद्वा शिव्या देऊं लागला. रेवाशंकर हंसत हंसत निघून गेला.

तेवढ्यांत ट्रॅम आली. बावचळलेला रघुनाथ गडबडीनें ट्रॅमला लोंबकळत आंत चढला. खालच्या मजल्यावर जागा नव्हती म्हणून तो जिन्यानें वरच्या मजल्यावर गेला. तों वरच्या मजल्यावरहि खेंचाखेंच झाली होती. चांगली संभावीत माणसें खिडकींतून तोंड काढून मानवतेची शोभा न्याहाळत बसलीं होतीं. वरून चेष्टा–मस्करी करीत, आंतून मनाचा आंब्रटशोक पुरवीत. कंडक्टर रघुनाथवर खेंकसला–

" उभे राहूं नका, त्या कोपऱ्यांत एक जागा आहे, तिथं बसा. "

रघुनाथ तोल सावरीत जाऊन त्या बाकावर बसला.

आणि चपापला. —

शेजारीं एक मध्यमवयीन बऱ्यापैकीं बाई नटून थटून तोंडाला रंग लावून बसली होती. पाठीमागें कुणीतरी कांहीतरी चावट कोटी केली. माणसें फिदफिदलीं. आणि ती धीट बाईदेखील रघुनाथच्या नजरेला नजर देत धीटपणानें आणि चावटपणानें फिदफिदली.--

...खिडकींतील अप्सरा...

माल बघून घ्या ... सध्या शरीर तर घेऊन चला... हिरव्या निळ्या नोटा जवळ असल्या तर " कल्चर्ड " भावना हव्यातेवढ्या... माया ममतेच्या कोठारांना पोलादी कुलपं बसलीं आहेत...माया ममता आंबून आंबून...

शिधा–युगांतील प्रीत रेशमी...

दाम रोख तर...

रघुनाथ आंग चोरून बसतांच ती बाई त्याला सहजगत्या खेटून बसली.

रघुनाथच्या साऱ्या संवेदना, सारीं गात्रें खवळून 'भूक भूक' म्हणून ओरडत उठलीं. सभ्यतेचीं थडगीं फोडून दबलेल्या वासना उद्रेकून उसळल्या, आणि...

...फेर धरून नाचत गात म्हणूं लागल्या...

"काठोकाठ भरूं द्या पेला फेस भराभर उसळूं द्या,
प्राशन करतां सभ्यपणाचें ढोंग भराभर वितळूं द्या..."

...पोट फुटलें सभ्यतेची आंतडीं स्प्रींगसारखीं वर उसळलीं. आतां दाबून दाबून टिचभर जागेंत तीं कशीं बसणार?...

"नव्या मनूंतील नवदंभाचा भ्याड शिपाई आहे
कोण मला वठणीला आंणूं शकतो तें मी पाहें"...

रघुनाथ चोरट्या नजरेनें शेजारीं पाहूं लागला...—

...हलकेंच बरं का, हलकेंच... सभ्यता सांभाळून...चोरट्या नजरेंत देखील सहजतेचा शिडकावा...निष्पापतेचा मुलामा...ती भरदार देहयष्टी...ते मांसल दंड...अनावृत पदरांतून डोकावणारें यौवन...—

त्यानें तिच्या चेहऱ्याकडे पाहिलें. धीटपणानें नजरेला नजर दिली. चेहरा होता काळा सांवळाच. पण रंगवून गोरा केलेला—नपूंसकता रंगवून रंगवून निष्पाप करावी तसा... आणि डोळे निस्तेज पेंगुळलेले... घोटावारी काम कराणाऱ्या नटाचे पांचव्या अंकांत पेंगुळतात तसे...—

पेंगुळलेल्या डोळ्यांत तेज आणण्यासाठीं..त्यानं मुद्दाम खिशातून पैशाचें पाकीट बाहेर काढलें, आणि आंतल्या बऱ्याचशा निळ्या नोटा बाहेर काढून मोजल्यासारखें केलें. आणि परत पाकीट खिशांत ठेवतां ठेवतां...अगदीं सहज बरं का..सहज कोपरानें तिच्या आंगाला...—चल वेच फुलें, वेच भराभर बाई,ही हीच वेळ सोनेरी..—कोपरानें तिच्या आंगाला डिवचलें.

दोन डोळ्यांची भेट झाली—

—रोमिओ—ज्यूलियेटची पहिल्या नृत्याच्या वेळीं झाली ना. अगदीं तश्शीच...पण प्रेम?

प्रेम गेलं काळ्या बाजारांत. त्याला कोण काय करणार? नवा मन

आहे हा. इथें स्वप्नाळू हट्ट उपयोगी नाहीं. वस्तुस्थितीशीं लाचार तडजोड केली पाहिजे...

" झुरतो तुझ्यासाठीं परी कळणार हें तुजला कसें ?

डोळ्यांत हुहृत..छे,

डोळ्यांत भुक्ती माझीया जमल्यास वाच मदालसे "..

" मदालसे, मला तूं हवी आहेस ".." पण जवळ भरपूर "..

" अगदीं भरपूर प्रेम आहे ."..'' प्रेम जळूं दे, पैसे आहेत ना ?.."

खरंच हा बाजार आहे नाहीं ?..

प्रीति मिळेल का हो बाजारीं ?

प्रीति मिळेल का हो शेजारीं ?..

असले खिशांत पैसे तर बाजारांत ही असली प्रीति मिळेल...

आणि शेजारीं ?...

अनुराधेच्या मागें लागलेल्या निग्रो सैनिकाचें काय झालें आहे ना माहीत ? तो भिवा आडदांड राक्षस आहे. पिटून काढील तेव्हां...

दोन डोळ्यांची भेट झाली.

आणि सौदा ठरला......

...जन्मोजन्मींचा नव्हे, फक्त एका रात्रीचा. छुत्!...

सकाळीं आपण कुठें, ती कुठें ? कोण कोणाला परत भेटतो, ओळख देतो ? करून सवरून पुन्हां सारें कसे गुपचूप !... गु प चू प.!... सभ्यपणा म्हणतो गुपचूप !...गुपचूप... !

" काठोकाठ भरूं द्या पेला फेस भराभर उसळूं द्या,

प्राशन करुनी सभ्यपणानें सोंग आम्हांला मिरवूं द्या. "..

कोटाची कॉलर ऊंच होऊं दे...गु प चू प !

डोक्यावरची फेल्ट हॅट खालीं तोंडावर अधिक झुकूं दे...गु प चू प...

डोळ्यावर काळा चष्मा चढूं दे...गु प चू प !...

गुपचूप ! ...गुपचूप !...—

धाड धाड करीत ट्रॅम एका उंच इमारतीसमोर थांबली. बाई रघुनाथाला सूचक खुणावीत उठली. आणि ती लप लप करीत जिन्यांतून खालीं आली. तिच्या पाठोपाठ काळा चष्मेवाला बिचकत बिचकत उठला. खिडकीबहाद्दर फिदफिदले.

ट्रॅममधून बाई उतरली. पाठोपाठ काळा चष्मेवालाहि. ट्रॅम पुढें पळाली. काळया चष्मेवाल्यास हायसें वाटलें. बाईच्या मागोमाग त्यानें रस्ता ओलांडला, गल्ली ओलांडली. बाई एका उंच इमारतीच्या बसक्या दरवाज्यांतून आंत शिरली. पाठोपाठ काळा चष्मेवालहि.त्याच्याकडे पाहून " कल्चर्ड " हंसून ती बाई एक उंचच उंच गेलेला नागमोडी जिना लप लप करीत चढूं लागली.

जिना लप् लप् करीत चढूं लागली.

रघुनाथ क्षणभर घुटमळला.

आणि त्या उंचच उंच जिन्यावर घाबरत घाबरत त्यानें पहिलं पाऊल टाकलं.

—०— —०— —०— —०— —०—

'रघुनाथ क्षणभर घुटमळला.'

आणि त्या उंचच उंच जिन्यावर त्यानें पहिलें पाऊल टाकलं.-०००

...भूक आणि भीति रटरटा खिजूं लागल्या...विवेक, डोळयाच्या बुबुळांतून केविलवाण्या नजरेनें डोकावून पाहूं लागला.-०००

कांहीं दिसेना, म्हणून त्यानें डोळयावरील काळा चष्मा काढून घेतला आणि नागमोडी वळणें घेत उंच गेलेला जिना त्यानें डोळयाला ताण देऊन न्याहाळला.

जिन्याच्या लोखंडी कठड्या पाण्यांत सूर मारल्याप्रमाणें वर अस्मानांत-घुसला होता. पण मधून मधून त्याचे दांत पडले होते. (म्हातारपणा-

मुळें ! ) बाजूच्या भिंतींचे मोठमोठे पोपडे सुटून कलले होते. ( कोण्या भगीरथाची का वाट पहात होते ! ) सुटलेल्या पोपड्यावर पावसाच्या धारा पडून पाण्याचे प्रचंड ओघळ सुकून–( भिंत रडल्यासारखी दिसत होती. दगड विटा पचविणाऱ्या भिंतीच्या मुखावर अश्रू ! )

कर्रर, कर्रर-पायरी गणिक रघुनाथचा बूट त्या अंधूक प्रकाशांत कर-करूं लागला, रघुनाथला वाटलें जिना करकरून कण्हूं लागला आहे. कर्रर...कर्रर...कर्रर...-०००

स्फुंदत स्फुंदत म्हणते पायरी.
" हळूंच दादा...हळूंच जरा...हळूंच हळूंच टेकावा पाय."
मस्तीच्या नशेंत,
भोगाच्या धुंदींत,
खुळखुळणाऱ्या खिशामधल्या " मायेच्या " गुर्मींत,
हजारों उन्मत्त कामुक पावलें
चेचत ठेचत छाताड माझें
दाण्. दाण्, दाण्,...धाड्, धाड्, धाड्
खालून वरती, वरून खालती
जातांना येतांना
रोजचें मरण पाहतो म्यां डोळा सताड ठेवून.
येतात येथें यंत्रयुगांतील पायाचे पाईक
औटघटकेचा घ्यावया निवारा,
शोधाया उसन्या मायेचा उबारा,
शरीरांतल्या कणाकणांतून ठणकणाऱ्या पुरुषार्थाच्या
रुपेरी धारा
वोपाया " गुहेंत मदनदेवाच्या "
पण भाड्यानें माफक दराच्या !
किंवा पाझराया प्रचंड प्रवाह पुरुषार्थाच्या गंगामाईचा
क्षुधा-सागराच्या पोटांतले पुत्र तृप्त कराया...

हिरव्या निळ्या खिशामधल्या मायेच्या गुर्मीत
दाण्, दाण्, दाण्...धाड्, धाड्, धाड्...
चेचत ठेचत छाताड माझें
खालून वरती, वरुन खालती,
स्फुंदत स्फुंदत म्हणते पायरी
"हळूंच दादा..हळूंच जरा..हळूंच हळूंच टेकावा पाय!"

रघुनाथनें अगदीं हळूच पाय ठेवला.

...पायऱ्या गरागरा फिरूं लागल्या... सारीं गात्रें जळजळ जळजळ करीत उठली...

पूर आला पूर...पूर आला हो पूर...

मस्तीला आला पूर...उन्मादाला आला पूर...शृंगाराला आला पूर...धांवा, धांवा...वाचवा हो वाचवा...

बामण सांपडला पुरांत,...वाचवा हो वाचवा...

मस्तीचा पूर उधाणून दुथडी भरून वाहात होता. बघे सगळे कांठावर गंमत पहात टाळ्यापिटीत नाचत होते..हात मारता मारता रघुनाथ थकला..नसानसांतून वेणा उसळल्या...प्रवाहानें त्याचें शरीर एका भोवऱ्यांत खेंचलें...भोवऱ्यांत सापडून तो गरागरा फिरूं लागला... फिरत फिरत खालींवर डुबकणी घेऊं लागला...गरगरा..गरगरा..गरगरा खालीं वर..खालींवर..नाकातोंडांत मस्ती..

डोळ्यांकानांत मस्ती..मस्तीच मस्तीच...जीव गुदमरेपर्यंत मस्ती...

भोवऱ्यांत गरगर फिरणाऱ्या आपल्यां शरिराकडे रघुनाथनें पाहिलें फेसाळणाऱ्या मस्तींत काया घुसळून घुसळून निघत होती. मस्तीच्या लाटा थडाथड शरीरावर फुटत होत्या. शरीराचा कण न कण रेशा न् रेशा बदलीत होत्या. नव्यानें घडवीत होत्या. मातीच्या फिरत्या गोळ्यावर कुंभाराच्या चापट्या बसाव्यात तशा लाटा फटाफट आपटत होत्या.

शरीर बदलत होतें. रूप बदलत होतें..रंग बदलत होता.

पण आत्मा अचंब्यानें हा बदल पाहात होता...वरून मस्तीचा पूर धो धो वाहात होता...डोळे वितळले, नाक वितळले, कान वितळले, तोंड वितळलें, हातपाय वितळले, सारें शरीर वितळून वितळून लोळा गोळा झालें...

विश्वकर्माच्या कारखान्यांत जुने भाग टाकून नवें बसवून देण्यासाठीं हजारो कारागीर खपूं लागले...

लोळयागोळयाचा लोखंडासारखा रस झाला...

जुन्या मुशींतून नव्या मुशींत...

नवे डोळे, नवे नाक, नवे कान, नवे हात पाय, नवें नवें शरीर उमटलें...

आत्म्यानें स्वतःकडे निरखून पाहिलें...आणि तो...ओरडला... अरे हा तर रेवाशंकर ..

खदखदा शरीर हंसून म्हणतें...होय मी रेवाशंकर, माझी आठवण केली होती ना ! मी भोगलेली जंमत तुला भोगायची आहे ना ! "...

रघुनाथ मधल्या पायरीवर पुन्हा घुटमळला.सरसरून स्मृतीनें दंश केला. सार्‍या आठवणी भुताप्रमाणें फेर धरून नाचूं लागल्या. स्वातंत्र्यदिना-दिवशीं रात्रीं...रेवाशंकरच्या खोलीवर...ओल्या मित्रांच्या अड्ड्यांत... रघुनाथ तेवढा सोड्याच्या बाटलींत...बाकीचे पतंग मदिरेच्या आकाशांत ...सर्वांचे पतंग झिंगूं लागले...पतंगाला वरची हवा लागण्यासाठीं रेवा-शंकर काल घडलेली आपली अगदीं ठेवणींतली जंमत सांगूं लागतो... बाकीचे आंबटशोकी पतंग जिभल्या चाटीत ऐकूं लागतात...रघुनाथ तेवढा त्यावेळीं आंगावर कांटा येऊन...

...त्या वेळीं अंगावर कांटा आला असला तरी काय असा नेहमीं
नेहमीं थोडाच येईल... शिवाय त्यावेळीं आंगांत अशी मस्ती उसळत नव्हती...

आत्मा म्हणतो... तरी पण नको बुवा. आपण आपले इथंच डुंबत
तळाशीं पडून राहूं...

वेड तर नाहीं लागलें? ये इकडे. असा पळूं नकोस. असा चिमटींत धरून
माझ्या हृदयाच्या कप्प्यांत देतों ठेवून तुला...

पण मला शरीरांत न मिसळतां मोकळा सोडशील?...

वेडा! तुला घेऊन कायमचा हृदयांत ठेवून मी थोडाच जन्मभर जळवा लावून घेणार आहे? घटकाभर थोडीशी जंमत...वाटल्यास पावती देतो आत्मा मिळाल्याची...आत्मा मिळाल्याची पावती...

ऐक तर! कान खोलून ऐक! डोळे सताड उघडून पहा!...मुंबईच्या
या वस्तीमधें फर्मास पोरी मिळतात असा सुगावा लागलाय. फर्मास पोरी बरं...एकापेक्षां एकेक..पण कोणाला वाटेल त्या लुंग्या सुंग्याला नाहीं. धाग्यानें धागा बांधावा लागतो, इथल्या दादा लोकाशी. पोलीस मागावर असतात. पण हे दादा लोक त्यांचें बारसें जेवून बसले आहेत. त्यांना खरं गिऱ्हाईक कोण बनावट कोण हें नुसत्या नजरेवरून समजतें...आतां पाहा, या अंधाऱ्या फुटपाथवर जरा उगीचच रेंगाळत...तो पहा पान-पट्टीच्या दुकानांत बिडी पीत बसलेला एक पठाण कसा डोळे टवकारून मांजरासारखा पहात आहे. आलाच तो रेंगाळत या बाजूला.. आपल्या-बरोबर चालतां चालतां हलकेच.." क्या चाहिये साब! लडकी होना?"

"हां, हा, बिलकुल खुबसूरत् लडकी होना.." सौदा ठरला. समोरच्या
चौकांतील एका व्हिक्टोरियाला खुणावतांच ती दुडकी धांवत येऊन उभी राहते. आपल्या पाठोपाठ पठाण आंत येऊन बसला. व्हिक्टोरिया निःशब्द वातावरणांत गल्लीबोळांतून चालली आहे. एका उंच इमारती-

समोर ती थांबते. पठाण खालीं उतरून गाडीचीं सर्व झांपडें लावून घेतो. घाबरूं नकोस, हा कांहीं सुरा काढणारा पठाण नाहीं. आणि उगारलाच तर एक हात पाठीवर आणि दुसरा पोटावर आहेच. सौदा पुरा करायची या भागांतली ही एक रीतच आहे. पैसे मोजून घेऊन त्यानें पाकीटांत घातले. आंगावर दिसतात लक्तरें, पण पैशाचें पाकीट तर पहा कसें टेसदार आहे ! झांपड बाजूला सारून पठाण निघून गेला. पैशाला हातो-हात फसवून तर नव्हे ना ! ..छे रे, पांढरपेशा जगांतली ही दानत नव्हे. हीं माणसें जितकीं बाजारी आणि क्रूर, तितकींच सौदा ठरला म्हणजे व्यवहाराला चोख...व्हिक्टोरियावाला मागें न पाहतां बिडी पिऊं लागतो. ...पांच मिनिटें गेलीं..दहा मिनिटें गेलीं,..अजून कां येत नाहीं हा इसम ? चौथ्या मजल्यावर खोल्याखोल्यांतून बंदोबस्तानें ठेवलेल्या असतात या पोरी. फूस लावून पळवून आणलेल्या असतात या पोरी ! असे मोकळ्या-वर सोडायला लागले त्यांना हे दादा लोक म्हणजे दुसऱ्या दिवशी तुरुं-गाची वाट धरावी लागेल त्यांना...पहा, झापडें दूर झालीं, आणि एक छोकरी आत येऊन बसली. पाठोपाठ पठाणदेखील. व्हिक्टोरिया चालूं लागली. टॉर्चचा झोत तिच्या तोंडावर टाकून पठाण विचारतो, माल पसंत आहे कीं नाहीं ?..त्यांत पसंत नापसंतीचा प्रश्न येतो कोठें ? बोलून चालून बाजारचा माल...मा..ल..कशी हरिणीसारखी बुजलेली, भेदरली... अंधारच आहे, तेव्हां जरा गळ्याभोंवतीं हात टाकून जवळ ओढून थोडी आपुलकी घेऊं या भोगून..वा, मानेवरचा हात काढून हातांत घेतला की या छोकरीनें...

सोळा वर्षांची ही छबकडी..पण कशी गुलजार आहे !...

पठाण म्हणतो—इथं गाडीत नको...कमरा जवळच आहे, केव्हां येणार आहे हा कमरा कोण जाणे ! सर्वांगाला कसा ठणका लागला आहे. व्हिक्टोरिया थांबली. पठाण उतरला. अंधाऱ्या इमारतीतील एका

खोलीचें कुलूप काढून तो आंत गेला. कळ दाबन त्यानें दिवा लावला. छबकडी आंत गेली. आतां आपणहि...

ओ, हो. किती सुन्दर. या लहानशा खोलींत नुसता थाट उडवलाय. तो छप्परपलंग...त्या मऊ मऊ गाद्या गिरद्या...ते मोठमोठे आरसे... ते गालिचे..हा पठाण मोठा रसिक दिसतो...दोन छानदार उदबत्या पेटवून पठाण म्हणतो मी बाहेर गाडींत थांबतों, तुमचें काम उरका आणि मला हांक मारा. मी बाहेरून दाराला कडी लावून घेतों...बाहेरून दाराला कडी ? तें कां ?...आंतून कडीच नाहीं वाटतं ? नसेना कां ! पण एकदा टळ म्हणावें बाहेर...

पठाण बाहेरून कडी लावीत, " आये मोहोब्बत क्या जवानीका दर्द है " गझल गुणगुणत निघून गेला. आतां काय आपण आणि ही छबकडी...

छप्परपंलगाच्या कडेला कशी अधोवदन होऊन बसली आहे. पहिलाच दिवस आहे तेव्हां ही बुजायचीच..पहिला दिवस ! ! कोणाचा ! आपला की तिचा ?...चूप...चूप...जवळ घेतली तर रडायला लागली. नाटकी असतात या बाया. अशा रडण्याभेकण्याला आपण भीक घालायला लागलों तर तर उपाशी उठावं लागेल भरल्या ताटावरून...

रडूं दे...रडूं दे...पण स्पर्श कसा मखमाली... रडतां रडतां छोकरी एकदम् बिलगून म्हणते..." साहेब माझ्यावर एक दया करा..." दया करा म्हणे...कसली दया ? छप्परपलंग सोडून संन्यास घेऊन निघून जाऊं ?...

ऐकून घ्यायला तर काय झालं ? जरा आंजारून गोंजारून ती म्हणते हा पठाण मेला दुष्ट आहे, निर्दय आहे. यानें मला पूर्वीच नासली आहे. रोज रात्रीं हा माझ्यावर बळजबरी करतो. गिऱ्हाइकाला मात्र सांगतो, कीं माल कोरा आहे म्हणून...

अरे चोरा हा तुझा कोरा माल काय ? ठीक आहे, आतां बक्षिसी मागायला येईलच गुलाम...कोरा नसला तरी माल कसा रसरशीत आहे. आपल्याला काय तेवढंच...

ती म्हणते, रोज रात्रीं हा पठाण असा एकाद्या गिऱ्हाइकाला घेऊन येतो आणि या खोलींत घालून बाहेरून कडी लावून घेतो...

अरे बापरे, आणि काय लुबाडीत नाहीं ना मारपीट करून ?

—आणि गिऱ्हाइकाचें काम झालें म्हणजे मला एकटीला या खोलींत कोंडून ठेवून निघून जातो. आणि मग अर्धरात्रीं दारू पिऊन चार दोस्तांना घेऊन तो परत येतो. इथें जुगाराचा अड्डा बसतो. आळी-पाळीनें एक एक जुगारी मला पलंगाकडे घेऊन जातो. खुशीनें नाहीं गेलें तर जबरदस्तीनें...आणि मी अडथळा केला तर मला बडव बडव बडवून...

...पाजी बदमाश...हंटरनें फोडून काढला पाहिजे या नराधमाला. असल्या कोवळ्या जीवाला चतकोरासाठीं लांडग्याच्या पुढें टाकतो ? कोण माणूस आहे कीं हैवान !...तरीच लुच्च्यानें दाराला आंतून कडी कोयंडा ठेवला नाहीं...

ती म्हणते, रोज रात्रीं हा पठाण एकादेंच गिऱ्हाइक पटवून आणतो. तारुण्यांतले हे दिवस मी जर एकेका गिऱ्हाइकालाच पटविण्यांत घालविले तर म्हातारपणीं खाऊं काय माती !...

म्हणजे ! एका रात्रींत किती गिऱ्हाइकं पटवावीं म्हणते ही बया ! माणसाचें शरीर आहे कीं यंत्र ! आणि शरीराचें एकदां यंत्र झाल्या-नंतर आपल्यासारख्या रसिकांना त्यांत काय गोडी वाटणार ?

.. ती म्हणते, या पठाणाला व्यवहार अगदीं कळत नाहीं. हेच दिवस त्याचे नि माझे चार पैसे मिळवावयाचे. त्यांत जर त्यानें मला अशी खराब केली तर, माझें जळो एक, पण त्याचें तरी कसें होईल ! आज

चार पैसे मिळतात म्हणून हा दादा झालाय या वस्तींतला. उद्यां पैका गमावला म्हणजे याला कोण विचारणार ?

...अजब विचारसरणी आहे या बयेची...आपल्यासारख्यांना लुबा-डून ही बया आपली म्हातारपणाची तरतूद करणार...आणि तो बदमाश ‘ दादा ’ म्हणून मिरवणार...

ती म्हणते, साहेब, मी आज तुमचें समाधान करतें, पण माझ्यावर तुम्ही एवढी दया करा... तुम्ही सांगाल तसें वागतें...पण...

पण काय करा ? काय लचांड आहे आणखी ?...

ती म्हणते, तुम्ही इथून जाल तेव्हां मला बरोबर घेऊन माझ्या मकां-णाशीं मला सोडून द्या...तोंडावर मी बुरखा घेईन, तुमची इज्जत नाहीं खराब करणार मी...तो मांग आढेवेढे घेईल, पण तुम्ही त्याचें ऐकूं नका...माझ्यावर एवढी दया कराच साहेब... वा वा वा, त्या पठाणाला म्हणे विरोध करा...त्या अडदांड राक्षसाला ? नकोरे बुवा...

पण ‘ हो ’ म्हणायला काय जातंय ? ‘ हो ’ म्हणतांच किती विश्वा-सानें ती बिलगली ?...

भूक..भूक..भूक...लागली !

भूक..भूक..भूक...भागली !

भूक भागली. काम झालें. औट घटकेचें प्रेम निवालें. निवून निवून कालासारखें गार गार पडलें...

पठाण दार खडकावतो आपण घाईनें कपडे चढवतांच छोकरी पुन्हां येऊन बिलगते. आणि म्हणते, साहेब...आपणही...लक्षांत आहे ! ...

पण किती रुक्ष स्वरांत...

भूक भागली, काम आटोपलें.

बूट चढवून, बुट घालून...एकदम...एकदम बरं का, तिच्याकडे दृष्टिक्षेपहि न करतां ..

दार उघडून एकदम बाहेर...

साहेब...तिचाच हा अस्पष्ट आवाज...

ए छोकरी, कहांतक जाते हो तुम...काड...काड...मारलं वाटतं त्यानें तिला ..अरेरे, गरीब बिचारी...तिरीमिरी येऊन ती खालीं कोसळते. गुळणा फुटून नाकातोंडातून रक्तच रक्त....सौदा पुरा करून आपण पुन्हां चौचाकींतून एकटेच....

आ हा हा, काय पण गार झुळूक आली...जीव कसा गुदमरून गेला होता...

हं, हा घे तुझा आत्मा तुला परत...

हा माझा आत्मा ? हा तर रक्ताळला आहे ?

म्हणून काय झालं ?असल्या गमती जमतींत एकदोन छाप उठायचेच...

रघुनाथ दचकून भानावर आला. पहिला जिना संपला होता. आणि लप लप करीत बाई दुसऱ्या मजल्यावर जिन्यांतून चालली होती. निढांवलेल्या मनानें रघुनाथानें आजुबाजूला पाहिलें. ती बाई पुढें आणि तो मागें या खेरीज कोणीहि नव्हतें. तो दुसऱ्या जिन्यापाशीं आला, आणि त्यानें पहिल्या पायरीवर पाऊल टाकलं.

करर्र...करर्र...करर्र...

पायरीगणिक बूट करकरूं लागला. पायऱ्या तुडवून रघुनाथ जिन्यांत-ल्याच पहिल्या वळणापाशीं आला. वळणावर एक मध्यभागीं आरसा लावलेला होता. भला मोठा सहा फूट उंच, पण ऊन पाणी खाऊन मळलेला, आणि कमेरत पुढें पोक आलेला. रघुनाथनें सहज आरशांत नजर टाकली. आंतला रघुनाथ जाडजूड कमरेत सुजलेला ढेर-पोट्या दिसत होता. आपलें तें रूप पाहून तो स्वतःशींच खदखदला...

ढेरपोट्या खदखदूं लागला. जाडजाड पोटऱ्या...त्यावर जाडजाड सैनिकी बूट...आरशांतला गोरापान जाडजाड सैनिक खदखदून

खांदे उडवूं लागला...आपलें स्थूल पोट आवरून हंसूं लागला...गोरापान ...सैनिक...अरे हा तर होमी बाटलीवाला...

होमी खदखदून म्हणतो, होय पराक्रमाचें दैवत शय्येवर न्यायला सोबत करायला आलोय...

रघुनाथनें आरशावरील नजर काढून पाऊल गडबडीनें उचललें आणि तो पुन्हा जिना चढूं लागला.—

—...आरशांतला बाटलीवाला आरशांतून डोकावून म्हणतो, आत्म्या आत्म्या, पळतोस कोठें ? चल माझ्याबरोबर...ब्रह्मदेशाच्या युद्धांत... रंगूनच्या आघाडीवर...

आत्मा पळूं लागला. बाटलीवाला कमरेचें पिस्तूल रोखून म्हणतो, आत्म्या आत्म्या,मागें फीर...पिस्तूल पाहून आत्मा घाबरला.आत्मा शरण गेला...फार किरकिरतोस नाहीं?...ये इकडे...थोडी मौज करूं या आपण...आजचा शेवटचा दिवस...रंगूनमधील आजची शेवटची संध्याकाळ...उद्यां सकाळीं मागें कूच...मागें मागें पळून...उद्या इथें जपान्यांचें राज्य...जाळपोळ लुटालूट मांडून विध्वंस करण्याची, शत्रूच्या हातीं एकहि वस्तू धड लागूं न देण्याची आम्हाला सक्त आज्ञा मिळाली आहे...पहा तर केवढी लूट मिळाली आहे...जीव कसा अगदीं थकून गेला आहे...थकलेल्या जीवाला आराम मिळण्यासाठी एकादी छोकरी... होमीनें आत्मा हिसकला आणि फौंटन्‌पेन्‌मागें हृदयांतल्या कप्प्यांत ठेवून दिला...

...कमरेला दोन बाजूला भरलेलीं पिस्तुलें अडकवून सैनिकी वेशांत होमी मोटारसायकलवरून चाललेला आहे. वेगदर्शक काटा चाळिसावरून पन्नासाकडे आणि पन्नासाकडून साठाकडे झुकत आहे. तरी होमी मजेंत पाइप ओढीत बेदरकारपणें गाडी नेत आहे. शहराबाहेरील लष्करी तळ ओलांडून गाडी रंगूनशहराच्या हद्दींत शिरते. लष्करी सैनिकाची गाडी

गुरगुरतांच लुंग्या नेसलेले आणि वाळलेल्या गवताचीं शिरस्त्राणें घातलेले, थापटक्या चेहऱ्याचे खुजे ब्रह्मी लोक घबराटीनें पळापळ करतात...लहान थोर, म्हातारे, तरुण, सारे हाताला लागेल तें घेऊन वाट फुटेल तिकडे पळत सुटतात. सैनिकाची मोटर गुरगुरतांच रस्तेच्या रस्ते ओस पडत आहेत... गाडी हमरस्त्यांतून जातांना होमीचे भुकेले डोळे आजुबाजूच्या इमारतीवरून गरागरा फिरतात. परंतु बहुतेक इमारती ओस पडल्या आहेत. उरलेल्याचीं दारें खिडक्या मोटरचा आवाज ऐकतांच भराभर लावून घेतलीं जात आहेत.

इतक्यांत, अगदी अचानक—

समोरच्या आडव्या गल्लींतून एक गुलजार कुत्री केंकाटत रस्ता ओलांडत जाऊं लागते. होमीचें लक्ष नाहीं. कुत्री थेट गाडीसमोर येऊन पोंचते. आणि काय झालें हें कळण्याच्या आंतच मोटरीचीं चाकें तिला चिरडून, छिन्नविछिन्न करून पुढें जातात. चडफडत होमी गाडी थांबवतो. शिवी हसडत मागें पाहतो. एकाएकी त्याचे डोळे चमकतात.

रक्ताच्या थारोळ्यांत केंकाटणारी कुत्री अखेरचे अचके देऊं लागते. आणि तेवढ्यांत गल्लींतल्या समोरच्याच घराचें दार उघडून एक तरुणी...

एक ब्रह्मी सुकुमार तरुणी बरं का, किंचाळत धांवत बाहेर येते. पाठोपाठ एक बुड्ढा, बहुधा बाप असावा तिचा, तिला आवरीत सावरीत धांवतो. तरुणी रक्ताच्या थारोळ्यांतील निर्जीव देह कवटाळते. उमसून रडत शिव्या शाप देण्यासाठीं ती वर पहाते, तोंच भुकेल्या नजरेचा सैनिक हातात पिस्तुलें घेऊन तिच्यावर मोहरा करीत जिभल्या चाटीत येतो.

ती एकदम घाबरते- लाडक्या कुत्रीचें प्रेत तसेंच टाकून ती एकदम

आंत पळते. पाठोपाठ बुड्ढा चडफडत शिव्या देत लगबगीनें घरांत पळूं लागतो.

स्थूल पोटाचा सैनिक विकट हंसत मागोमाग धांवतो. म्हाताऱ्याची लगबग ती किती चपळाईची असणार ! होमी त्याला दारांतच गांठतो. अर्धवट बंद होत असलेल्या दारांतून त्याची लुंगी ओढून तो खेचतो. दार सताड उघडें पडतें. बुड्ढा आडवातिडवा होत जमीनीवर कोसळतो. लाथेनें कुचलीत होमी त्याला आंत लोटतो. आणि हातांतल्या पिस्तुलाचा छतावर बार काढीत आंतून दार बंद करून घेतो....

पिस्तुलाचा आवाज ऐकताच गल्लीतील एकूण एक खुराड्यांतील खिडक्या किलकिल्या होतात, जीव जिवाणूं डोकावतात आणि किलबिलत पुन्हा गुडूप होतात. रोखलेल्या पिस्तुलासमोर होमीच्या पायावर लोळण घेत बुड्ढा आपल्या भाषेंत दया याचना करतो. आणि ती तरुणी भयभीत होऊन त्या लहानशा खोलीच्या कोपऱ्यांत उभी राहते. पाय लटपटत असतात...

म्हाताऱ्याची वटवट ऐकून कंटाळलेला होमी बारीक नजरेनें सबंध खुराडें न्याहाळून घेतो. आणि घरांत तिसरें जिवाणूं नसल्याची खातरजमा करून घेऊन त्या तरुणीला अधिक भेदरविण्यासाठीं, म्हाताऱ्याला लाथाबुक्यांनीं पुन्हा बदडतो.शिव्या हसडतो. आरडाओरडा करून उगीचच दम भरतो. भरलेलें पिस्तुल छतावर रोखून पुन्हा एकदां गोळी झाडतो. आणि गर्जना करीत, जमिनीवर सरपटणाऱ्या लाचार बुड्ढ्यावर पिस्तुल रोखून असा कांहीं आव आणतो कीं—

भेदरून गप्प राहिलेल्या तरुणीलाहि वाचा फुटते. ती होमीचे पाय धरते. आणि म्हाताऱ्याला जीवदान देण्यासाठीं गयावया करते.

आणि मग होमी हंसतो. उगीचच रागीट चिंताक्रांत मुद्रा करतो. मग दयेचा आव आणतो. आणि मग एकदम कडाडत म्हाताऱ्याजवळ

आपल्या मनांतली मागणी करतो. अस्सल ब्रह्मी मार्षेत तो त्या तरुणीला सुनावतो. या खोलींत बाजेवर माझी इच्छा तृप्त करायला तूं तयार हो. नाहींतर चालली ही गोळी म्हाताऱ्याच्या छाताडावर...

तरुणी भयभीत होऊन मागें सरते. बुड्ढा आतां तिला गयावया करून आपल्याला वाचवण्यासाठीं तिला विनवितो. त्याची इच्छा तृप्त करण्यासाठीं तिच्याजवळ रदबदली करतो. पण ती गप्प, दगडी मुद्रा करून पहात रहाते.

म्हातारा पुन्हा होमीच्या पायाशीं लागतो. बलात्कारानें आपली इच्छा तृप्त करून घेण्याची तो त्याला अनुज्ञा देतो. आणि नाहीतर होमी काय तिला तसाच सोडून पळणार होता ? पण तिनें आपण होऊन म्हाताऱ्या-प्रमाणें सरपटत आपल्या पायाशीं लागलें पाहिजे, या हट्टाला होमी पेटतो. होमी दुसऱ्या बाजूनें पिस्तूल उपसून तिच्यावर रोखतो. आणि एक एक पाऊल तिच्याजवळ जाऊ लागतो. ती भेदरून मागें मागें सरते. इतक्यात—

पलीकडल्या अंधाऱ्या दालनांतून मेलेल्या कुत्रीचीं कच्चींबच्चीं भुंकत थयथयाट करीत धांवत येतात आणि होमीवर चाल करून जाऊं लागतात. होमी चवताळतो. आपले गलेलठ्ठ पाय देऊन दोन पिल्लें तर तो साफ चिरडून टाकतो. आणि तरुणीला केवळ भिवविण्यासाठीं तिसऱ्या जरा मोठ्याशा पिलावर तो गोळी झाडतो. केंकाटत तेंहि पिलूं रक्ताच्या थारोळ्यांत गडबडा लोळून गतप्राण होतें...

--आणि होमीची अपेक्षा सफल होते. पिस्तुलाच्या त्या सणसणाटी आवाजानें आणि रक्ताच्या त्या थारोळ्यानें तरुणीचा धीर सुटतो. आणि आवेश मावळून तिची नजर—

पांढरीं निशाणें दाखवीत खालीं वळते !

होमी हुरळून जातो. खुंटीला टांगलेली एक दोरी तो सरसर ओढून

काढतो, आणि त्या तरुणीपुढें टाकतो. त्या दोरीनें म्हाताऱ्याचे हात-पाय बांधण्याची तो तिला आज्ञा देतो. निमूटपणें ती खालीं वाकून दोरी उचलते आणि म्हाताऱ्याचे हातपाय करकचते. म्हाताराहि जिवाच्या लाचारीनें गडबड करीत नाहीं. होमी पुन्हां पिस्तुलें कमरेला लटकावतो आणि बांधलेल्या बुड्ढयाला लाथेनेंच ढकलीत भिंतीकडे तोंड करून कुशीवर पाडून ठेवतो. गडबड न करण्याची सक्त ताकीद देऊन होमी तिच्या-कडे वळतो.

ती एक एक पाऊल भेदरून लज्जेनें मागें सरते. होमी कामातुर होऊन पुढें लंपटपणानें पावलें टाकतो. तिचा पाय अडखळतो आणि ती अचानक बाजेवर मागें कोसळते.

होमी वखवखून तिच्यावर झडप घालतो आणि...

...दबत दबत आलेल्या वाघानें पाडसावर एकदम झडप घातली.

आणि भुकेनें वखवखून लचके लचके तोडत तें कोवळें मास तो चवीनें चघळूं लागला. वर आकाश निरभ्र होतें. आणि समोर मैलचे मैल लांब हिरवेंगार निर्जन माळरान पसरलें होतें. हृदयांतल्या कप्प्यांतून टुण-कन् उडी मारून रक्ताळलेला आत्मा बाहेर पडला आणि– ...

—निश्चेष्ट पडलेल्या तरुणीकडे रोखून पाहात ओरडला ही तर मारी

...ही तर गौरी...ही तर अनुराधा...

ही तर इंदुमती ...

कुठली राधा, कुठली इंदुमती ? हें मांस आहे मांस...लज्जतदार मांस...पंजा मारीत वाघोबा गुरगुरले. वाघोबांच्या पंजाप्रहारानें रक्ता-ळलेला आत्मा तडकला आणि धडपडत ठेचकाळत तो पुन्हा हृदयांतल्या कप्प्यांत जाऊन बसला...वाघोबांचें पोट भरलें. ईश्वराला धन्यवाद देत वाघोबा मेलेल्या पाडसापासून दूर झाले. त्यांनीं समाधानाचा मोठा ढेकर दिला.

निश्चेष्ट पडलेल्या तरुणीपासून दूर होत होमी कपडे सावरूं लागतो. लाथेनें तिला पुन्हा डिवचत तो पिस्तुलें उपसतो. भेदरून ती उठते आणि वस्त्रें सावरूं लागते. तेवढाहि विलंब त्याला सहन होत नाहीं. संतापून तो तिचीं वस्त्रेंच हिसकतो. तिची लज्जा उघड्यावर पडते. बुड्ढयाचे हात-पाय सोडण्याची तो तिला आज्ञा देतो. पाठमोरी होऊन अर्धवट वस्त्रें सावरीत ती म्हाताऱ्याच्या अंगाशीं बिलगून मुसमुसत त्याला मुक्त करूं लागते— ...

वाघोबांनीं ढेकर दिला आणि पाडसाकडे पाहिलें. अजून पाडसाच्या शरीराची थोडीथोडी हालचाल होत होती. अजून धुगधुगी होती. वाघोबांना एकदम संताप आला आणि झडप घालून त्याच्या नरडीचाच घोट घेत— ...

पाठमोऱ्या तरुणीवर आणि जमीनीवर सरपटणाऱ्या म्हाताऱ्यावर पिस्तूल चालवितो—

कानठळ्या बसविणारे आवाज, पाठोपाठ हृदयभेदक किंकाळ्या....

आणि रक्ताचें थारोळें...

रक्ताचें थारोळें...रक्ताचे नदी...रक्ताचे सागर...

मस्तीच्या पुरांत रक्ताचा पूर...

सुरेख संगम किती सखे बाई.. मस्ती मिळाली रक्ताप्रती...हं, हा घे तुझा आत्मा...रक्ताळलेल्या आत्म्यावर सहस्र तडे!...एवढ्या गमती-जमतींत एक दोन तडे जायचेच. फुटका नको असेल तर काचेचा बसव... बाजारांत हवे तेवढे नकली नगाला नग मिळतात–...

—रघुनाथ दचकून भानावर आला.

दुसऱ्या मजल्याचा जिना संपला होता. आणि लप लप करीत बाई तिसऱ्या मजल्याकडे जिन्यांतून चालली होती.

जखमी जनावराप्रमाणें फुत्कार टाकीत रघुनाथ तिसऱ्या जिन्यापाशीं

आला. आणि त्यानें पाहिल्या पायरीवर पाऊल टाकलं.

धडपडत ठेचकाळत रघुनाथ तिसरा जिना चढूं लागला. डोळयांपुढें अंधेरी आली आणि रघुनाथचें पाऊल चुकलें. उजव्या पायाला पायरीची अशी जबरदस्त ठोकर बसली कीं, तो कळवळतच खालीं वाकला. आंगठ्याजवळील बुटाचा टवका उडून आंत नखाला जिव्हारीं ठेच बसली होती. रक्त ओघळून जीव कळवळला. मुरगाळलेला पाय सावरीत रघुनाथ लंगडत पायरी चढूं लागला.–

–रघुनाथ लंगडत पाठीला कुबड काढून जिना चढूं लागला. लं ग- . ड त...पॅरीसच्या कुबड्याप्रमाणें...क्लिओपात्राच्या. .महालांत... सीझरप्रमाणें...

रक्त...रक्त...रक्ताचा पूर...आनंदाचा पूर...विजयाचा पूर...डोक्यावर शिरस्त्राणें घातलेले आणि अंगांत चिलखत अडकविलेले नाकेले रोमन् सैनिक हातांतले भाले आणि ढाली नाचवीत रस्तोरस्तीं गर्जना करीत...ओरडत...नाचत. दवंडी पिटीत...‘ सीझर महाराजांचा जयजयकार असो ’...‘ इजीप्तच्या राणीला आम्ही बेड्या घालून रोमला धिंड काढीत नेणार ’...अशा घोषणा करीत चालले आहेत...

लंगडा रघुनाथ भांबावून गर्दीतून वाट काढीत होता...लंगडा कुबडा ... पॅरीसचा कुबडा गर्दीतून बावचळून धक्काबुक्की करीत चालला होता...

लंगडा आणि कुबडा...हीऽ हीऽ हीऽ... प्रचंड हंशा. भरवस्तीच्या चौकांत लंगड्या आणि कुबड्याच्याभोंवतीं सैनिक दाटीनें जमले होते, हंसत होते, नाचत होते, आणि कुबड्याची टवाळी करीत होते. कोणी म्हणतो...सीझर महाराजांचा विजय झाला, आतां तरी या कुबड्याला राणी द्या हो...कुबड्या आणि लंगड्या राजाला हवीय राणी...राणी क्लिओपात्रा ..हीऽहीऽहीऽ...कुबडा शरमून लोभीपणानं बघूं लागला.

सारे टवाळखोर सैनिक आणि लुटमार करून आणलेल्या छबकड्यादेखील खदखदां हंसू लागल्या...

कुबड्याला कुठलें राज्य. .कुबड्याला कुठली राणी ? ...

अहो कुबडोजीराव दिसते आहे का एकादी राणी ? ...हीऽ हीऽ ही ...मनगटांतल्या जोरावर असल्या छबेल्या भाळतात...पाठीवरल्या कुबडावर आणि लंगड्या पायावर नव्हे. हीऽ हीऽ ही...

कुबडा शरमिंदा झाला आणि गर्दीतून वाट काढूं लागला. कुणी त्याची तरवार ओढली, कुणी त्याचा भाला हिसकावला, कुणी त्याच्या लंगड्या पायात पाय घातला, आडवातिडवा होत कुबडा जमिनीवर कोसळला. हीऽ हीऽ हीऽ करीत सैनिक विजय घोषणा करीत निघून गेले. सावरीत कपडे झटकीत कुबडा उठला. लपक् लपक् लपक्...कुबडा रस्त्याच्या कडनें जाऊ लागला...

लपक् लपक् लपक् लपक्
रखडूं लागे लंगडा कुबडा
रस्त्या रस्त्यांतून गल्ली गल्लींतून
घरकुलाच्या शोधात या निवारा.
झडले नगारे. झडल्या भेरी
कोणा सम्राटाच्या राज्याची झळक सप्तरंगांमधें
राजधानी ही ?

नवरसांच्या दिव्य नगरींत
श्रृंगारराज हत्तीवरुनी मिरवे थाटांत
प्रणय-सुमनें. उन्माद गुलाल
दिशादिशांतून टाकत फेकत,
पुरुषार्थाच्या पराक्रमाचें चीज करीत !
नाकेले धिप्पाड पराक्रमी सारे
देखणे तसेच गुलजारहि

श्रृंगारराजाला करुनी मुजरा अप्सरा नेती कुंजाकुंजांतून.
लपक् लपक् करीत पातला
लाचार दुर्दैवी लंगडा कुबडा.
कराया मुजरा वांकता जराशी
उडे तारांबळ सावरतांना पाठीचें गाठोडें, पायाचें लोढणें
हीऽ हीऽ हीऽ विखारी हंसती सैनिक
आणि गालांत-श्रृंगारराज !
बोलूं लागलें लंगडें कुबडें नशीब त्याचें कण्हत कुंथत...
मखमालीच्या मऊ स्पर्शासाठीं
मऊ मायेच्या आपुलकीसाठीं, जीव तान्हेला.
रस्त्यारस्त्यांतूनी हिंडला आपुल्या मायभूमींत
शोधाया एकादी जिवाची सखी.
खडे मारुनी करीती याची संभावना सारे
लहान थोर, सभ्य टवाळ.
कोमल मनाच्या लावण्यमयीहि गवाक्षांतूनी
पाहतां याला खदखदती.
बसक्या नाकाच्या, तिरळ्या डोळयाच्या,
दंताड्या मुखाच्या, भीषण मुद्रेच्या,
थोटक्या हाताच्या, फेंगड्या पायाच्या,
रंभा अप्सरा थुंकती याच्या पाठी पोटावर
दीड दमडीच्या बाजारी अप्सरा पाहतां याला
लावीती दारें नाक मुरडून-
कोण घेणार अशा कुबड्याला आपुल्या प्रेमळ बाहुपाशा-
मधें ? कोण घेणार अशा लंगड्याचें गोड चुंबन ?
लपक् लपक् लपूके पाय
पाठीवरती विश्वाचें ओझें
घेऊन रखडे लंगडा कुबडा...

सम्राट सीझर इजीप्तवर चाल करून तिथल्या राणीला गुलाम करून

आणणार अशी वार्ता आली. भराभरा सैनिक जमा होऊं लागले. कोणी तरी कुबड्याला म्हटलें—जा सैन्यांत. हो दाखल सैनिकांचा खुषमस्कऱ्या म्हणून. सैन्य विजयी झाल्यावर जितांच्या देशांत बायकाना काय तुटवडा ? पायाशीं लोळत येतील...कुबड्याला लोभ सुटला, आणि शेवटच्या आशेनें तो सैन्यातहि हरप्रयत्नानें दाखल झाला.

आणि आतां, नाईल नदीच्या खोऱ्यांत सम्राटांच्या विजयाची नौबत झडली. खुद्द सम्राट महाराणी क्लिओपात्राच्या महालांत तिचा खास पाहुणचार घेत पडले. मोठमोठ्या अधिकाऱ्यांपासून घरादाराला मुकलेल्या सैनिकांपर्यंत साऱ्यानीं यथेच्छ लुटमार करून घरें थाटलीं तरी कुबडोजीराव मात्र कोरडेच राहिले.

लाचार होऊन कुबडा रडकुंडीला आला तरी घर करायला त्याला कोणीहि तरुण स्त्री वश झाली नाहीं. एकादी छोकरी जबरदस्तीनें आपलीशी करण्याची एकादे वेळीं संधी मिळे, पण त्याच वेळीं त्याचा लंगडा पाय नेमका मधे लुडबुडूं लागे, आणि पाठीवरचें कुबड मणाच्या ओझ्याप्रमाणें त्याला खालीं रिचवून टाकी...

कुबडा सावरत सावरत उठून बसला, आणि शरमिंदेपणानें शहराची हद्द सोडून लष्करी तळावडे रखडूं लागला...शहराची हद्द संपली असेल नसेल—

तोंच एकाकी निर्जन रस्त्यावर एक छोकरी...एकटीच बरं का, एकटीच, गांवाकडे मेंढ्या वळवीत चालली होती. मजेत ..नाचत... गात..रसरशीत नवयौवना..कुबड्याच्या भीषण मुखावर स्मितरेषा उमटली. कुबड्याचें नशीब उघडलें. एकाएकी आंतला लांडगा आनंदाच्या उकळ्या फुटून नाचायला लागला. कुबड्यानें त्यांतल्या त्यात कपडे ठाकठीक केले, आणि ऐटींत...ऐटींत बरं का. जरा ऐटींतच कुबडोजीराव रखडूं लागले.

छोकरी नाचत गात मेंढ्यांना कुरवाळीत जवळ आली, आणि निर्भयपणें कुबड्याची दखलहि न घेतां पुढें जाऊं लागली...आंतल्या लांडग्याचें लाचार कोकरू झालें. आणि—कुबडोजीराव लंपटपणें मागें वळून हात पसरून आलिंगनासाठीं रखडत धांवले. त्याबरोबर ती सावध झाली आणि भडकून तिनें त्याला असा हिसडा दिला कीं, कुबडा विवळत आडवा-तिडवा होत खालीं आदळला. त्याच्या तोंडावर थुंकत ती ओरडली—"आली असली एवढी मस्ती तर मेलेल्या प्रेताला जाऊन बिलग.."

फणकाऱ्यानें ती छोकरी मेंढ्यांच्या मागें पळाली. लाचार कुबडा हताशपणें उठला आणि सैनिकांच्या तळाकडे जाऊं लागला.

सैनिकाचा तळ दृष्टिपथांत आला. बुटके बुटके तंबू दिसू लागले. एका तंबूपाशीं सैनिकांची गर्दी उसळली होती. हास्यविनोदाचा जल्लोष चाललेला होता. कोणीतरी दुरूनच कुबड्याला पाहिले. आणि सैनिक ओरडले-अरे तो पाहा कुबडा आला.आणा आणा...खेचा, ओढा त्याला इकडे...कुबडा घाबरला. आता पुन्हा धिंड निघणार या कल्पनेने तो भयभीत झाला. तोंच दोनचार सैनिक धावले आणि त्यानीं त्याला जबरदस्तीनें तबूकडे फरफटत नेले. सारे खदखदूं लागले. कोणीतरी म्हटले-कुबड्याला भूक लागलीय...कोणीतरी छेलछबेली ग्याहो... ही ऽ ही ऽ ही...हा कुबडा तेवढा राहिलाय...सोडा त्याला, सोडा त्या सटवीवर...आरडाओरड करीत सैनिकानीं कुबड्याला तंबूच्या दारांतून आंत ढकललें. आणि...

जिना संपलेला होता. बाई भिंतीला रेलून उभी होती. मुरगाळलेल्या पायानें लंगडत रघुनाथ वर आला. औटघटकेच्या प्रेमाचा सौदा ठरला, पटला. खिशांतून पाकीट काढून रघुनाथनें पैसे चुकते केले. किलकिलें दार उघडून बाई आंत गेली. आंत झगझगीत प्रकाशांत चारदोन टवाळ कॅरमचा डाव मांडून रंगांत आले होते. गिल्ला करीत होते. आणि

दोन तीन बाया फिदफिदत पानतंबाखू खाण्यांत गुंतल्या होत्या. किलकिल्या दारांतून पांच सहा वर्षांचा एक उघडा नागडा पोरगा बाहेर आला आणि हात पसरून म्हणतो " साहेब, बक्षिसी ! "...

...सहा वर्षांचा दिनू म्हणतो—साहेब बक्षिसी !...

रघुनाथचें आंग शहारलें. त्यानें खिशांत हात घातला. मघाशीं घेतलेल्या पेपरमिंटच्या गोळ्यांपैकीं एकदोन उरल्या होत्या त्या हाताला लागल्या. त्या बाहेर काढून त्यानें पोराच्या हातावर ठेवल्या. इतक्यांत मागच्या मागें पोराला कोणीतरी खसकन् ओढून घेतलें. आणि दोन रपाटे मारीत आंत कोठेंसें नेलें...

त्याच्यासमोर भराभर रांगेनें पानतंबाखू खाणाऱ्या बाया येऊन उभ्या राहिल्या...

—ओठ रंगलेले तोंडें रंगलेलीं
मदनाची सेना राहिली खडी ताजीम देत,
पराक्रमाचे देखत म्हाया आज शय्येवरी-
अदामपपांचा लाडका पुत्र,
ईव्हममीच्या छोनुल्या कन्यका,
समोरासमोर पातले आज ज्ञानवृक्षाचें फळ भोगाया,
माता-पितरांना धन्य कराया.
रंगलेले ओंठ शैशवकाळीं असतील कोणा माता-पित्यांनीं मायेनें चुंबिलें !
विटता माया माता-पित्यांची
सगेसोयरे आणिती तेच मायावी ओंठ
बाजारामध्यें पांथस्थासाठीं.
युगायुगांच्या पोरक्या बालिका,
आणखी अशा कित्येक कित्येक निर्वासितांच्या आया बहिणी कांता कन्यका

**जिवाच्या भयें मायभूमीला पारख्या होऊनं आल्या ज्या इथें**
**शेंकडों मैलांची तुडवून भूमी —**
**क्षुधा-सागराच्या पोटांतले पुत्र तृप्त कराया**
**जयांचे आंगीं**
**कणकणांतून ठणकणाऱ्या पुरुषार्थाच्या रुपेरी धारा चैतन्य देती**
**तयांना वोपाया ' गुह्य मदनाची '**
**पण भाड्यानें माफक दराच्या...—**

लप लप करीत येत पहिली बाई म्हणते—" कोणती पाहिजे ती निवडा..."

रघुनाथनें गांगरत बोलणाऱ्या बाईचाच हात धरला. सगळ्या रंभा फिदीफिदी हंसल्या. बाई हंसत म्हणते--" मी धदा करीत नाहीं रावसाब..."

रघुनाथ शरमला. " कां करत नाहींस ? " हा प्रश्न ओठांतच विरघळला. त्यानें रांगेतल्या पहिल्या बाईकडे डोळे वर न करतांच बोट दाखविलें. बायका फिदफिदत आंत गेल्या.

आतला झगझगीत दिवा मालविला गेला. पलीकडच्या अंधाऱ्या खोलींतला दिवा लागला गेला. बाईनें रघुनाथला त्याचा हात धरून अंधार झालेल्या दालनांतून पलीकडे नेलें आणि खोलीच्या दाराकडे बोट दाखविलें. रघुनाथ भीतभीत आंत शिरला आणि—

...तंबूचा पडदा सारून लपक् लपक् करीत कुबडा आंत आला. आणि समोरचें दृश्य पाहून थबकला. तक्तपोशीवर एका सुकुमार स्त्रीचा देह निश्चेष्ट पडला होता. रक्ताचे ओघळ बाजूनें वहात होते. आणि ती अखेरचे आंचके देत होती. कोणा सैन्यांतील अधिकाऱ्यानें पकडून आणलेल्या या छोकरीनें त्याला हवें असलेलें सुख तिनें बिनबोभाट दिलें नाहीं म्हणून त्यानें तिला सैनिकाच्या भुकेल्या लांडग्यांच्या हवालीं केलें होतें. सैनिक एका पाठोपाठ एक तिच्यावर तुटून पडले आणि...

कोणीतरी तंबून डोकावून खदखदत म्हणाले--बघतोस काय कुबड्या ? उरक आपला कार्यभाग ती मरायच्या आधीं. नाहींतर तिच्या थडग्यांतल्या मर्मीकडे जन्मभर पहात जिभल्या चाटीत बसावं लागेल तुला... हीऽहीऽहीऽ . .कुबडा लंपटपणानें सरपटत जवळ गेला आणि...

रघुनाथनें दार लावलें, आणि पलंगाकडे पाहिलें. जवळ जवळ विवस्त्र होऊन एक बाई पेंगुळलेल्या डोळ्यांनी उताणी पडली होती. खोलीमधें उग्र घाणीचा कुबट दर्प त्याच्या नाकामधें सरसरून शिरत होता. रघुनाथकडे पाहून ती बाई म्हणते "हं या, उरका साहेब लवकर नि द्या बक्षिसी. गिऱ्हाइकांचा खोळंबा होतोय बाहेर.."

त्या उग्र दर्पानें, तिच्या शब्दानें, आणि तिच्या बाजारी शरीरावयव प्रदर्शनानें रघुनाथला पोटामधें ढुचमळू लागलें, कालवाकालव होऊं लागली. पण तो दबकत जवळ जाऊन पलंगावर बसला. सर्वांगाला घाम सुटला. डोळ्यापुढें काजवे चमकू लागले. कानांत धबधब्याचा सुन्न आवाज घुमूं लागला. घशाला कोरड पडली. हातपाय थरथर कापूं लागले. जवळ सरकत त्यानें तिच्या अंगाला स्पर्श केला...—

लंपटपणें कुबड्यानें तिच्या शारिराजवळ हात नेला, आणि तिनें अखेरचा अचका देऊन मान टाकली. कुबड्यानें तिचे मृत शरीर कवटाळलें. आतां कोण त्याला विरोध करणार ? सारें काहीं त्याचेच होतें. त्यानें तिला घट्ट घट्ट कवटाळलें...

तो कालासारखा थंडगार झणझणीत स्पर्श...

तो कालासारखा थंडगार स्पर्श होतांच—

रघुनाथनें दचकून हात मागें घेतला चुकून निखाऱ्यावर हात पडावा त्याप्रमाणें !

रघुनाथचे डोळे खडखडीत उघडले. संवेदना जाग्या झाल्या. भूक तडफडत तडफडत मेली. उन्माद सैरावैरा दाही दिशांना पळूं लागला.

रघुनाथ लवंडलेल्या बाईच्या डोळ्यांत निरखून पाहूं लागला...

...कुबड्याच्या बाहुपाशांतली ती मृत तरुणी होती. .

होमीनें पिस्तुल चालवून मारलेली ती ब्रह्मी तरुणी होती...

रेवाशंकरनें भोगून टाकून दिलेली ती अभिसारिका होती...

आणि तिचे पेंगुळलेले डोळे...

काम करून थकल्याभागल्या इंदुमतीचे डोळे...

कष्टानें शिणलेल्या मारीचे डोळे...–

रघुनाथला एकदम शिसारी आली.

त्या ओंगळवाण्या दृश्याची, त्या बाईची आणि स्वतःची देखील.

बक्षिसाच्या लालचीने पलंगावर उताणी पडलेली बाई उठली. एकदम रघुनाथला बिलगत तिने त्याच्या गळ्यांत हात घातला आणि टाचा उचावत त्याला सम[illegible] त्याचा मुका घेतला.

सरसरून शिसारी येऊन रघुनाथनें एकदम तिला दूर ढकललें. वेड्या-सारखा तो दाराकडे धावला. बाई विवळत कोलमडत दूर कोसळली. दार सताड उघडीत रघुनाथ भ्रमिष्ट मनाने, तंद्राग्रू चघळीत बसलेल्या बाया आणि कॅरमचा डाव मांडून रंगलेले टोळभैरव याच्या अंगावरून ओलांडून जिन्याकडे धांवला.

बाया आणि टोळभैरव आ करून क्षणभर पाहातच राहिले. तेवढ्यांत शेजकरीण वस्त्रें सावरीत गिऱ्हाइकाच्या नांवानें शंखनाद करीत बाहेर आली. झाला प्रकार उमजतांच सारेच फिदीफिदी हसूं लागले.

पण रघुनाथला त्याचें भान होतें कोठें ? जिन्यामागून जिने तो धावत ...घसरत...पोहत...चालला होता. डोळ्यासमोर अंधेरी आल होती. शरिरांतल्या कणाकणांनीं बंड पुकारलें होतें ..

...उन्मादाचा पूर, मस्तीचा पूर एकाएकीं आटूं लागला...सारा उन्माद, सारी मस्ती भूगर्भात, बिळांत पळणाऱ्या उंदरांच्या रांगे-

प्रमाणें लुप्त होऊं लागली. आणि बघतां बघतां पात्र कोरडें ठणठणीत होऊं लागलें...

जीव–जिवाणू सरपटत तडफड तडफड करूं लागले...

गर गर गर, नुसता भोंवराच फिरत होता..मस्ती शिवाय, उन्मादाशिवाय भोंवऱ्यात गरगरणारे कुबड्याचे शरीर कोरडें झालेलें पात्र पुन्हा पुन्हा चाटीत तडफड तडफड करीत होतें...

तडफड करतां करतां, आंचके देता देतां...

कुबडा कात टाकूं लागला...नाक, डोळे, हात, पाय, सारे अवयव वितळूं लागले...नुसता लोळागोळा भोवऱ्यांत गरगरूं लागला... आणि आचके देत होमी बाटलीवाला कुबड्यांतून उमटूं लागला...

एवढा बेडर नि आगाने आडदांड, पण मस्तीविना कसा बकऱ्यासारखा ओरडत होता, विवळत होता, माशासारखा तळमळत होता...पण तोहि स्वस्थ नव्हता. तोहि कात टाकत होता.. गरगरणाऱ्या भोवऱ्यात त्याचाहि चेंदामेंदा झाला आणि लोळयागोळयांतून तडफड तडफड करीत हलकेंच...हलकेंच बरं का,रेवाशंकर उमटूं लागला...त्याचें तें गुलजार हास्य, ती विलासी नजर, यांचा मागमूसदेखील नव्हता. गोळी घातलेल्या कुलुंगी कुत्र्याप्रमाणें तो विवळत होता, सरपटत होता, तडफड करीत कात टाकत होता...भोवऱ्याची गरगर कमी झाली. ठिचलेल्या अवयवांचा गोळा मंदपणें गरगरूं लागला. हळू हळू...अगदीं हळू हळू, जुनें नाक, जुने कान, जुने डोळे, जुनें तोंड, जुने हातपाय, जुनें शरीर उमटूं लागलें...

रघुनाथचें शरीर उमटूं लागलें...

तडफडत आचके देत...

रक्ताळलेला आत्मा, तडा गेलेला आत्मा, पिंजून चिंध्या चिंध्या झालेला आत्मा, जवळ उभा होता. त्यानें आपलें शरीर ओळखलें,

आणि ढंबरडा फोडून तो शरिराकडे धांवला. शरीर आपल्या आत्म्याची लक्तरें अन्तःकरणांत गोळा करूं लागलें.

आत्म्याला आपलें शरीर सांपडलें.

शरीराला आपला आत्मा सांपडला....--

पण त्या उन्मनस्क मनस्थितींत तिसऱ्या आणि अखेरच्या जिन्यावरून लगबगीनें उतरतांना रघुनाथचा दुखरा पाय घसरला आणि तो गडगडत खालीं कोसळला. गडगडत खालीं कोसळला तो थेट रस्त्यावरील गटारामधें शरीर ठायीं ठायीं ठेंचून गेलें. अंगामधें उठण्याइतकें देखील त्राण राहिलें नाहीं. मेंदूला क्षणभर ग्लानी आली. आजूबाजूचे रस्त्यावरचे आणि पान-पट्टीच्या दुकानातले बघे धांवले आणि त्यांनीं त्याला गटारांतून हात देऊन वर काढलें. एक म्हणतो-- "झेपत नाहीं तर इतकी प्यावी कशाला ?"

रघुनाथला तेवढ्यांत आपल्या खर्चानें एक पानपट्टीवाला आपल्या दुकानांतलें लिंबू पाजतो. रघुनाथ सावरलेला पाहतांच बघे फिदफिदत पांगले...रघुनाथनें भानावर येऊन आजूबाजूला पाहिलें. रस्त्यावर वर्दळ जोरांत चालू होती. गाडी घोडे धांवत होते. मोटारी आडव्या उभ्या फरांटत होत्या. ट्रॅम संथ वेगानें येत जात होत्या. आणि माणसें माडी-वरील अप्सरा न्याहाळीत व माकडचेष्टा करीत रेंगाळत चाललीं होतीं...

एकटाच...त्या कोलाहलांत...एकटाच, वेडापिसा...उघडा बोडका घाणीनें डबडबलेला...घामानें निथळलेला...केस पिंजारलेले...डोळे तारवटलेले...पोशाख अस्ताव्यस्त झालेला...--

एकटाच लोकल स्टेशनच्या दिशेनें रघुनाथ रखडूं लागला...

...धबधबा धो धो धो कोसळत आहे...पाण्याचा नव्हे...माणसांच्या हृदयांचा...शेकडों हजारों रघुनाथ...शेंकडों हजारों माणसें...शेंकडों हजारों हृदयें वाहात येऊन कड्यावरून खालीं दरींत कोसळत आहेत... कोसळतांना आक्रंदत आहेत...

एकटाच...एकटाच...एकटाच...

बेवारशी...बेवारशी...बेवारशी...

खालीं कोसळलेल्या हृदयांच्या चिंध्या चिंध्या...

हृदय फुटून लोण्यासारख्या भावना फेसाळून झालेल्या लाटा...

रक्ताच्या पुरांत फेसाळलेल्या भावनांच्या लाटा...

धबधब्याच्या काठावर सहलीसाठीं जमलेले सौंदर्यवादी प्रवासी म्हण-तात...किती सुंदर...किती पवित्र...प्राचीन आर्यांनीं या निसर्गरम्य स्थळीं तपश्चर्येसाठीं एकादें देऊळ कसें बरें उभारलें नाहीं ? धबधब्याच्या उजव्या कडेला मोठा फलक झळकत आहे...

" मा न व ता ध ब ध बा "

आणि डाव्या बाजूनें काढलेल्या कालव्यावर पाटी लावलेली आहे–

" मानवता लेफ्ट बँक कॅनॉल... "

रक्त–भावनांचा पूर संस्कृति समृद्ध करीत चालला आहे...–

स्टेशनवर लोकल उभी होती. आणि माणसांची तुफान गर्दी उसळली होती. इतकी गर्दी कीं, रघुनाथ धांवत प्लॅटफॉर्मवर आला तरी डब्यांत शिरण्यापुरतीदेखील जागा नाहीं. प्रत्येक डब्याच्या दाराशीं माण-सांची खेंचाखेंच आणि भाडणतंटे. भिरभिर रघुनाथनें सबंध प्लॅटफॉर्म पायाखालीं तुडवला. पण 'जागा नाहीं, पुढें जा,' हाच मंत्र त्याला ऐकावा लागला. तेवढ्यात गार्डानें भोंगा दिला आणि ती हालली. रघु-नाथनें श्वास आवरून जीव मुठींत धरून चपळाई केली आणि हालणाऱ्या डब्याचा दांडा पकडून तो लोंबकाळला आणि फूटबोर्डवर एक पाय ठेवून त्यानं एक अधांतरीं सोडला.

आंत प्रशस्त बसलेल्या कांहीं मालक मंडळींतील एक महाराज ओर-डले, " मिस्टर मरायचंय काय ?"

गाडी वेगांत जाऊं लागली. गार वारा झोंबूं लागला. डोळ्यासमोर

रस्ते, इमारती, दिव्याची रोषणाई, गाडीघोडे, पळणारीं वाहनें, उलटीं पालटीं होत फिरूं लागलीं...

...हात सुटला तर ?...पाय घसरला तर ?...

हृदयभेदक किंकाळी...गाडीची सांखळी...अरे मेला मेला, गाडीखालीं गेला—आरडा ओरड खडखडत गाडी थांबते...गर्दी जमते... शिलगावलेली सिगरेट रागानें आपटीत गार्ड दिवा घेऊन गर्दीला दूर सारीत प्रेत पाहतो... " हात साला कशाला मरायला उभा राहिला होता ..गाडीच्या फुटबोर्डावर !... दोन पोर्टर येतात, प्रेताची मामुली तपासणी करतात...खिशातल्या पाकीटांतल्या नोटा हळुच गार्डाच्या खिशांत...नांवानिशी नाहीं... ओळखदेख नाहीं...बेवारशी गाठोडें इस्पितळाच्या आवारांत... इस्पितळाच्या आवारांत बेवारशी प्रेत... चिरफाड करायला अधाशी विद्यार्थ्यांची एकच घाई...चिंध्या चिंध्या झालेल्या शरीराची चिरफाड काय करणार कपाळ ? मेंदु ठीक असतां तर तेवढाच बरणींत...पण तोहि फुटून जमिनीवर उदक शिंपावें तसा ओघळून भूमी पवित्र करीत आहे...

ह्या बेवारशी ठरवून म्युनिसीपालिटीच्या ताब्यांत...बेवारशी शरीर धबधब्यांतून वहात आलें...

काठावर बँड लागलेला आहे...सनई—चौघडा झडत आहे...

ब्राह्मण वेदऋचा म्हणत आहेत...

पाद्री पवित्र शास्त्र वाचत आहे...

मौलवी कुराणपठण करीत आहे...

कोसळतांना बेवारशी शरीर कण्हत आहे...

एकटाच...बेवारशी...एकटाच...बेवारशी...

चक्कर येऊन रघुनाथचे खरोखरीच हात सुटूं लागले, पाय घसरूं

लागले. दारांत एक मुंडासेवाला म्हातारा उभा होता. त्यानें रघुनाथचे सुटणारे हात एकदम धरून खेचले. आणि तो ओरडला—

" अरं गड्यानों सरा सरा, या भाऊला वाइच् चक्कर आल्यावानी दिसतीया..." गर्दीची रघुनाथला आंत घेण्यासाठीं तारांबळ उडते. रघुनाथला त्यांतल्या त्यांत आंत येण्यापुरती वाट करून मुंडासेवाला म्हणतो–" या भाऊ, असं वाइच वाकुनशान या आंत, आन पडा हतं जराशान...अवो, जीवाला जपाया होवं...हात सुटलं असतं तर ? यंतराला काय माया है मानसावानी ? "...

ती माया, ती ममता...जखमेवर घातलेल्या आयोडीनप्रमाणें रघुनाथला झोंबत गेली...

...थकलेल्या भावना, शिणलेल्या कल्पना...
दमलेलें शरीर, म्हातारा झालेला उत्साह...सारे म्हणूं लागले...

**लडिवाळ नखरे करणारी मारी नको...**
**रेवाशंकरची राधा नको...**
**होमीनें मारलेली ब्रह्मी तरुणी नको...**
**कुबड्याच्या बाहुपाशांतली लावण्यमयीहि नको....**
**मला हवीय इंदुमती,**
**मला हवाय दिनू...नंदा...निमा.**
**मला हवी आई, मला हवे आहेत आण्णा...**
**मला हवी आहे सारंगी ....**
**मला हवं आहे घर ! घर ! घर !**
**पण नशीब म्हणतें-कुठलें घर ? कुठली सारंगी ?**
**कुठली झोंपडी ? कुठली इंदुमती ?**
**कुठली माया ? कुठली आई ?**
**कुठला दिनू , कुठली निमा, कुठला नंदा ?**
**कुठला महाल ? कुठला वाडा ?**

उद्यां सकाळीं नऊ पस्तीसची लोकल !
उद्यां सकाळीं नऊ पस्तीसची लोकल !
उद्यां सकाळीं नऊ पस्तीसची लोकल !—

—o—

## – उ प सं हा र –

. . . . अशी ही नांदते थोर संस्कृति,
जियेचा धागा सांपडतो मागें उपनिषदांत
असे हे वंशाज आर्य–पुत्रांचे
फांदी फांदीतून करीती गर्जना आणि घोषणा—
" .... सर्वेऽपि सुखिनः सन्तु
सर्वे सन्तु निरामयाः
सर्वे भद्राणि पश्यन्तु
मा कश्चित् दुःखमाप्नुयात्..."

———

लेखनकाल
एप्रिल–मे १९५०